# उपनिषत्संग्रह.

---

## तैत्तिरीयोपनिषत्

## शिक्षावल्ली.

संस्कृत टीका व मराठी अर्थ व समजुतीच्या

टिपा ह्यांसहित.

हा ग्रंथ

शांति, इंद्रियनिग्रह, वैराग्य इत्यादि गुणांनीं संपन्न अशा

अधिकारीजनांस परमेश्वराचें ज्ञान मिळण्याकरितां

**व्यंकटेश व रामचंद्र**

ह्यांनीं तयार केला तो

पुणें, शुक्रवार पेंठ येथें,

" ज्ञानप्रकाश " छापखान्यांत छापिला.

---

शके १८१४.



किंमत एक रुपया.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | २५ | ज्योतिष्वधि | ज्योतिष्ववधि |
| १० | १८ | अम्नापकं | अम्नामकं |
| १२ | ८ | अंतेवाषि | अंतेवासी |
| १३ | १९ | सुवर्ग्येण | सुवर्गेण |
| १४ | २४ | व | व, नसणें हें असणें शुद्ध आहे. |
| १५ | २२ | सर्वैवाग्व्याप्तेः | सर्वैवाग्व्याप्तेः |
| १९ | २२ | विस्तारवती | विस्तारयंती |
| १९ | २७ | इण्मताविति | इण्गताविति |
| २२ | १३ | प्राप्नुवंति | प्राप्नुवंतु |
| २३ | १३ | भुर्भुवः | भूर्भुवः |
| २६ | २१ | महश्शब्द | महःशब्द |
| ३८ | ९ | पंचकडयांनीं | पंचकडयांनां |
| ४० | १५ | मच्छादि | मत्स्यादि |
| ४८ | २३ | व्यवछेत्सीः | व्यवच्छेत्सीः |
| ५० | १७ | तेषा | तेषां |
| ५१ | १६ | विहार्य | विहाय |
| ५५ | ९ | यच्छंदसा | यश्छंदसा |

उपोद्घातांत. " श्रीशैल्य " चे जागीं " श्रीशैल " वाचावें.

# उपोद्घात.

सर्व मनुष्यें ज्ञान मिळविण्याला सारखे अधिकारी नसतात. उदाहरण, शाळेंत एकाच गुरूजवळ शिकणारे पुष्कळ विद्यार्थी असतात, परंतु ते सर्व सारखे विद्वान होत नाहींत. कांहीं उत्तम विद्वान होतात, कांहीं मध्यम होतात, व कांहीं कनिष्ठ होतात. ह्याचें कारण विद्यार्थ्यांमध्यें बुद्धीचे प्रकार निरनिराळे असतात किंवा त्यांची इतर स्थिति निरनिराळी असते. शिष्य बुद्धिमान असतो परंतु त्याला द्रव्यसामर्थ्य नसतें, द्रव्यवान असतो परंतु त्याला बुद्धि नसते, द्रव्य व बुद्धि हीं असतात परंतु शिकण्याची इच्छा नसते, किंवा अशक्त रोगी असल्यामुळें त्याच्यानें अभ्यासाची मेहेनत होत नाहीं, किंवा अभ्यास करीत असताच तो मरतो, इत्यादि अनेक कारणांमुळें सर्वांना सारखें ज्ञान मिळत नाहीं.

सर्व ज्ञानामध्यें ब्रम्हज्ञान हें फार सूक्ष्म असून प्राप्त होण्यास अतिशय कठीण आहे. हें ज्ञान मिळण्याला उत्तम बुद्धि व शांत चित्त पाहिजे. उत्तम बुद्धि फार विरळा असते. उत्तम बुद्धि असणें हें पूर्वजन्मार्जित सत्कर्मांचें फळ आहे. बहुतकरून मनुष्याचें चित्त इतकें चंचळ व गलबललेलें असतें कीं, तें एकाग्र होत नाहीं. ह्याचा अनुभव बहुतेकांना आहे. एका गोष्टीकडे चित्त लाविलें असतां तें तिकडेच कायम न रहातां हजारों विषयांकडे भटकतें, चित्त एकाग्र करण्याकरितां आपण शांत स्थळीं डोळे झांकून एकाच पदार्थाकडे लक्ष ठेवून कांहीं वेळ स्वस्थ बसावें म्हणजे चित्त त्याच पदार्थावर एकसारखें न राहातां अनेक गोष्टींकडे चित्त कसें भटकत जातें ह्याचा अनुभव येतो. जर आपण एक घटकाभर अमुक देवळांतील रामाच्या मूर्तीकडे लक्ष लावून राम राम म्हणत बसण्याचें मनांत आणून तसें करीत बसलों असतां कदाचित्त तोंडानें राम राम म्हणणें चालतें परंतु मूर्तीवरील लक्ष निघून दुसऱ्या

अनेक पदार्थांकडे जातें असें आढळेल. चित्त आपले स्वाधीन नाहीं तर त्यांत अनेक प्रकारच्या कुकल्पना येतात. उदाहरणार्थ, जर आपला कोणी प्रियकर नातलग दुसऱ्यागांवीं फार आजारी असून त्याच्या समाचाराकरितां उतावळीनें त्या गांवीं जाऊं लागलों असतां त्याच्या प्रकृतीच्या संबंधानें अनेक कुकल्पना मनांत कशा येतात ह्याचाही अनुभव बहुतेकांना आहे. ह्याशिवाय राग द्वेष मद मत्सर इत्यादिक कारणांनीं मनांत नानाप्रकारच्या कुकल्पना येत असतात हेंही आपणास माहीत आहे. अशा मनुष्याचें चित्त शांत व शुद्ध करण्याची तजवीज प्रथम केल्याशिवाय त्याला ब्रम्हज्ञानाच्या उपदेशाचा कांहीं उपयोग नाहीं. अशा मनुष्याचें चित्त शांत व शुद्ध करण्यास्तव कर्म मार्ग योजिला आहे. ब्राम्हणानें जीं काय कर्में करावींत तीं वेदांत व धर्मशास्त्रप्रकरणीं अनेक ग्रंथांत सांगितलीं आहेत. जो जातीचा खरा ब्राम्हण आहे व ज्याचे वाडवडील ब्राम्हणधर्मानें चालत आले आहेत त्यास वेदोक्त ब्रम्हकर्में काय आहेत हें सहज माहीत असतें.

जो मंद बुद्धीचा मनुष्य ब्रम्हज्ञानाची इच्छा करितो त्यानें कसें वागावें, काय कर्में करावींत, व त्यास काय माहीत असलें पाहिजे हें ह्या उपनिषदांत थोडक्यांत सांगितलें आहे. म्हणून ह्या उपनिषदास शिक्षावल्ली असें नांव दिलें आहे. ह्यांत सांगितल्याप्रमाणें जो कर्में करीत जाईल त्यासच ब्रम्हज्ञान मिळण्याचा अधिकार आहे.

चित्त शुद्ध करण्याचे जे अनेक उपाय आहेत त्यांपैकीं तीर्थयात्रा करणें हा एक महत्वाचा उपाय आहे. यात्रा करण्याचीं मुख्य ठिकाणें उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत फार आहेत. यात्रेस जाणाऱ्या लोकांचा समुदाय नेहेमीं बराच मोठा असतो. ह्यास्तव यात्रेसंबंधी माहिती पुष्कळ लोकांना उपयोगी पडणार आहे. म्हणून यात्रेविषयीं खालीं वर्णन दिलें आहे.

आपण जेथें राहातों तेथून काशीयात्रेस निघण्याचे दिवशीं घृतश्राद्ध हें नांदीश्राद्धाच्या रीतीप्रमाणें करून हातामध्यें तुपाचें भांडें घेऊन

जमिनीवर तुपाचे थेंब पाडीत पाडीत यात्रेस जाण्याच्या वाटेनें एक कोस-भर जावें, व तेथें त्या दिवशीं भोजन करून राहावें. दुसरे दिवसापासून प्रत्येक दिवशीं प्रातःकाळीं स्नानसंध्या करून अग्नीला होम देऊन देवाची पूजा करून देव व अग्निकुंड मस्तकावर घेऊन बारा घटकेपर्यंत जित-कें चालवेल तितकें वाटेनें चालत जावें. नंतर जो गांव लागेल तेथें राहून मध्यान्हकाळीं स्नानसंध्या, नैवेद्यवैश्वदेव, भोजन, इत्यादि करून सायंकाळची संध्या तेथें करून तेथें मुक्काम करावा. ह्याप्रमाणें मार्ग क्रमीत जावा ह्याप्रमाणें करण्याची शक्ति नसल्यास घोड्यावर बसून जावें. तसें न होईल तर बैलगाडींत जावें. परंतु अशाप्रमाणें वागणूक करण्यास हल्लींच्या स्थितीला बरोबर मेळ बसत नसल्यामुळें आगगाडीचा उपयोग करणें प्राप्त पडतें. गोदावरी नदीच्या दक्षिणेस जो यात्रेकरू राहात असेल त्याणें गोदावरी नदीचें दर्शन घेऊन तेथील विधि करण्यासाठीं नाशिक अथवा नगर जिल्ह्यांत पुणतांबें ह्या क्षेत्रीं जावें. तेथें नारळ, हळदकुंकू, बदाम, खारीक वगैरे पांच फळें, व शक्त्यनुसार द्रव्य घेऊन गोदावरीचें दर्शनास जावें. गोदावरीपुढें विडा, नारळ व दक्षिणा ठेवून नमस्कार करावा. व तेथील ब्राम्हणाची मदत घेऊन ते सांगतील त्याप्रमाणें मंत्र म्हणून फळ पैसा गंधफूल अक्षता हे ओंजळींत घेऊन पाण्यानें पांच अर्घ्ये नदींत सोडावीं. नंतर नदींत एक स्नान करून क्षौराचा संकल्प करावा, आणि क्षौर केल्यावर भस्म इत्यादिक दहा प्रकारचीं स्नानें करावीं. इतके वेळां स्नानें करण्याची ताकद नसल्यास तितके वेळां मार्जन करावें. आपलीं पापें नाहींशीं होण्यास्तव आपले शक्तीप्रमाणें होतील तितकीं कृच्छ्रें सो-डावींत. त्या दिवशीं उपोषण करावें. दुसरे दिवशीं महालयाप्रमाणें सर्व पितरांच्या उद्देशानें तीर्थश्राद्ध करावें, व श्राद्धसांग होण्यास्तव एक गोप्र-दान द्यावें. सवडीप्रमाणें त्याच दिवशीं अगर दुसरे दिवशीं क्षेत्रांतील देवांचीं दर्शनें घ्यावीं. तिसरे दिवशीं गोदावरीची पूजा करावी, सौभाग्य-वायन द्यावें, शक्त्यनुसार ब्राम्हणसुवासिनी ह्यांस भोजन घालावें. ह्या

प्रमाणें तीन दिवस राहून चवथे दिवशीं यात्रा सांग होण्यासाठीं क्षेत्राहून निघते वेळीं उपाध्यास शक्त्यनुसार दक्षिणा देऊन पुढें जाणें करावें. ह्या पुढें जबलपुराच्या आलीकडे तीन कोसांवर नर्मदा नदी लागते तेथें एक क्षेत्र आहे. त्या ठिकाणींही गोदावरी प्रमाणेंच सर्व विधि करावा. तेथून प्रयाग ह्मणजे अलाहाबादेस जावें.

## प्रयाग.

प्रयागांत यात्रेकरी लोक धारागंज येथें उतरतात. त्या ठिकाणीं जे उपाध्ये आहेत त्यांना प्रयागवळ असें म्हणतात. प्रयागांत भागीरथी, यमुना व सरस्वती ह्या तीन नद्यांचा संगम आहे. भागीरथीचें पाणी पांढरें आहे, यमुनेचें पाणी काळेंभोर आहे, व सरस्वतीचें पाणी तांबूस आहे. ह्या तिन्ही नद्यांच्या संगमास त्रिवेणी असें म्हणतात. सरस्वती ही नेहमीं दिसत नसून सकाळचें प्रहर दिवसाचे सुमारास किल्ल्याजवळ तांबडें पाणी लखलखतांना दृष्टीस पडतें. ह्या त्रिवेणी संगमावर जाऊन तेथें गोदावरी प्रमाणें गंगाभेट, अर्घ्य, क्षौर, स्नानें, उपोषण, तीर्थश्राद्ध, त्रिवेणी पूजा हे सर्व विधि करावेत. प्रयागांत सर्व गोष्टींपेक्षां मुंडणाचें माहात्म्य अधिक आहे. ज्यांस बाप आहे त्यांस इतर क्षेत्रांत क्षौर नाहीं, परंतु प्रयागांत त्यांसही क्षौर आहे. इतर क्षेत्रांविषयीं असा नियम आहे कीं, तेथें एकदां तीर्थविधि केल्यावर दाहा महिन्यांत त्या ठिकाणीं जाणें झालें असतां पुनः तीर्थविधि करणें जरूर नाहीं, परंतु प्रयागास हा नियम लागत नसून तेथें केव्हांही गेलें तरी तीर्थविधि करावा लागतो. प्रयागास प्रायश्चित्ताबद्दल कृच्छ्रें सोडतांना सातपासून तीनशेंसाठपर्यंत शक्त्यनुसार पाहिजे तितकीं कृच्छ्रें सोडावींत. ह्या ठिकाणीं पांच वर्षांचे आंतील मुलींचें मुंडण करितात. तेथें सुवासिनी स्त्रियांचा वेणीदान म्हणून एक विधि आहे. वेणीदान हें प्रथम जाणाऱ्यांस करावें लागतें. वेणीदानाची रीति अशी आहे कीं, प्रथम घरीं चांगल्या मुहूर्तावर बायकोनें चांगल्या बांगड्या भरून नवराबायकोनें मंगलस्नान

करावें. पुण्याहवाचन नांदीश्राद्ध करून बायकोनें पिंवळें पातळ नेसावें व नवऱ्यानें पिंवळें धोतर नेसून पिंवळेंच पांघरावें, आणि हातामध्यें सूपवाणाचें सर्व सामान घेऊन वाजंत्री वगैरे लावून मोठ्या मंगळ रीतीनें त्रिवेणीवर जावें. पूर्वीं नवऱ्यानें ज्याप्रमाणें मोठा संकल्प करून प्रायश्चित्ताचीं कृच्छ्रें सोडलेलीं असतात, त्याप्रमाणें बायकांकडूनही मोठा संकल्प करवून त्यांजकडून कृच्छ्रें सोडवितात. नंतर त्रिवेणीची यथासांग पूजा करून नंतर नवऱ्यानें बायकोची वेणी घालावी, अशा प्रसंगीं प्रयागवळ बरीच दक्षिणा लादतो. शिवाय दर वेणीदानास सरकारी कर आठ आणे पडतो व मुलींचें मुंडण करण्यास चार आणे सरकारी कर पडतो. नंतर नवऱ्यानें कातर घेऊन बायकोची वेणी तीन बोटें कातरावी, आणि कातरलेली वेणी सुपांत ठेवून तें सूप त्रिवेणींत सोडावें. विधि सांग होण्याकरितां घरीं आल्यावर ब्राम्हण व सुवासिनी ह्यांचें भोजन करावें. विधवा स्त्रियांस सर्व विधि पुरुषाप्रमाणेंच आहे. मकरसंक्रांतीमध्यें प्रयागास यात्रेचा भरणा जमतो, व त्यांत मकर राशींत गुरु व सूर्य हे दोन्ही असल्यास अतिशय मोठी यात्रा जमते. ह्याच सुमारास म्हणजे पौष वद्य ३० स अर्धोदय किंवा महोदय पर्व असतो त्या वेळीं अतिशय यात्रा जमते. जे गरीब लोक अशा वेळीं येतात ते फक्त क्षौर व स्नान करितात. मकरसंक्रांतीचे सुमारास धारागंजाहून त्रिवेणीस जाण्याचे रस्त्यावर अनेक प्रकारचे सामानाचीं दुकानें बसतात. त्यांत तऱ्हेतऱ्हेचीं पितळेचीं भांडीं, मेवामिठाई, धान्यें, चुरमुरे, चिवडा इत्यादि, कागद, चाकू, कात्र्या, इत्यादि सर्व पदार्थ विकण्यास आलेले असतात. दुकानांचे मधून मधून गोसावी बैरागी वगैरे साधुलोकांच्या छपऱ्या असून त्यांमध्यें ते आपआपले प्राणायाम करण्याचे वगैरे उद्योगांत असतात. कोणी मोठमोठाले देव्हारे मांडून पूजा व भजन करितात. ह्या बाजारापुढें जो बाजार लागतो त्यांत फुलें तुळशी ह्यांचे ढिगाचे ढीग पडलेले असतात. त्यापुढें घांटी लोकांचे चौरंग त्यावर मोठमोठालीं निशाणें व छत्र्या असे पुष्कळ

दृष्टीस पडतात. त्रिवेणींत यमुना स्थीर वहाते, परंतु भागीरथीच्या ओघाचा कांहींच नियम नसून पाणी नेहमीं कमीजास्त होत असतें. धारागंजाहून त्रिवेणी सुमारें दीड कोस आहे. तेथें बहुतेक लोक पायानेंच जातात. परंतु थंडीचे दिवसांत वाळूचा रस्ता फार थंड असल्याकारणानें पायानें जाण्यास फार अडचण पडते. म्हणून श्रीमंत लोक मेण्यांत बसून जातात. त्रिवेणींत तऱ्हेतऱ्हेच्या नावा दृष्टीस पडतात, व कांहीं नावा जलमंदिराप्रमाणें भासतात. कित्येक लोक प्रातःकाळीं त्रिवेणीवर स्नान करून दोन प्रहरचे वेळीं शुद्ध भागीरथीच्या दशाश्वमेध घाटावर स्नान करितात. त्रिवेणीला व शुद्ध भागीरथीला कोठेंही दगडी घाट बांधलेला नाहीं. यात्रेकरी लोक जी भागीरथी भरून आणितात ती दशाश्वमेधाहून भरून आणितात. कारण यमुनासंगम झाल्यावर भागीरथीचें पाणी नीट राहात नाहीं. प्रयागास मुख्य मुख्य देवस्थानें आहेत तीं येणेंप्रमाणें:—

१. त्रिवेणी.

२. माधव. माधवाचीं दोन देवळें आहेत. एक धारागंजांत आहे व दुसरे यमुनेच्या पलीकडे आहे. धारागंजांतले वेणीमाधवाचे देवळांत राजकीय शोभा विशेष आहे व यमुनेपलीकडील देवळांत एकांतपणानें तपश्चर्या करण्याला उत्तम सोय आहे. वेणीमाधवाला लोक नावेंत बसून जातात.

३. सोमनाथ. हें देऊळ त्रिवेणी संगमाचे पलीकडे आहे. तेथें महादेवाचें स्थान अरण्यांत आहे. सभोंवतीं बागबगीच्या असल्यानें देवालयास मोठी शोभा येते. साधु बैरागी लोक ह्या ठिकाणीं मोठ्या उत्कंठेनें तपश्चर्येसाठीं राहतात. त्रिवेणी व सोमेश्वर ह्यांचें वर्णन ऋग्वेद संहितेच्या पांचवे अष्टकांत आलें आहे.

४. भारद्वाज. हें भरद्वाज ऋषीचें स्थान आहे. येथें महादेवाची पिंडी व भरद्वाज ऋषि व आणखीं दुसरे देव ह्यांच्या मूर्ति आहेत. हें स्थान मीठगंजाचे सुमारास आहे.

५. वासुकि. हें स्थान दारागंजाचे नजीक अरण्यांत आहे. येथें महादेवाची पिंडी असून शेषाची मूर्ति आहे. येथून शुद्ध गंगा फार जवळ दिसते.

६. अक्षयवट. हें वडाचें झाड किल्ल्यांत आहे. किल्ला मोठा भव्य असून भूयकोट आहे. त्यास बुरूज मोठमोठाले आहेत. त्याचे आंत मोठमोठाल्या इमारती मजबूद व सुरेख अशा आहेत. झाड भुयारांत आहे. तेथें सुमारें पंधरावीस पाहे-या उतरून जावें लागतें. दिव्याशिवाय जातां येत नाहीं. तेथें नाशिकांतील सितागुंफेची आठवण होते. झाडा सभोंवतीं देवाच्या अनेक मूर्ति आहेत.

७. सगरकूक. येथें सगर राजाचे मुलगे कपील महामुनीच्या शापानें भस्म होऊन पडलेले असतां त्यांचा उद्धार भागीरथीच्या योगानें होऊन ते स्वर्गास गेले.

८. सरस्वति.

प्रयागांत पेढे, दहीं, पितळेचीं भांडीं, पेरू, बोरें, हे जिन्नस फार चांगले आहेत. राबडी म्हणून दुधाचा बासुंदीपेक्षांही घट्ट पदार्थ केलेला असतो तो खाण्यास फार चांगला आहे.

## काशी.

यात्रेकरू बहुधा प्रयागांत मकराचा एक महिनाभर राहून मग तेथून काशीस जातात. प्रयागास झालेला त्रिवेणीचा संगम तसाच पुढें काशीस गेला आहे. काशीस भागीरथीच्या काठीं चक्रपुष्करिणी नांवाचें एक तीर्थ आहे, तेथें गंगापुत्र म्हणून उपाध्ये असतात. ह्या तीर्थांत स्नान करण्यास्तव त्यांस कर ते जसा ठरवितील तसा द्यावा लागतो. निदान सवा रुपया पडतो. ह्या तीर्थाचें स्नान घडल्याशिवाय क्षौर होत नाहीं. हें स्नान व मनिकर्णिकेच्या घाटावरील क्षौर झाल्यावर तीर्थश्राद्धापर्यंतचा विधि प्रयागाप्रमाणेंच येथें करावा लागतो. काळभैरवाचें एक स्थान आहे. याचें दर्शन घेऊन त्याजपुढें साखरेचा घोडा व वडा ठेवून

नमस्कार करून बाहेरील बाजूस येऊन तेथें काळभैरवाचा गंडा बांधून घ्यावा लागतो, व तो बांधणारा तोंडानें कांहीं श्लोक म्हणून गंडा बांधून घेणाराच्या अंगावरून सोटा फिरवितो व पाठीवर सोटा हळूच एक दोन वेळां आपटतो. ह्याप्रमाणें काळभैरवाचें दर्शन घेऊन काळाष्टक म्हणून काळभैरवाकरितां आठ ब्राम्हणांस भोजन घालावें. काळभैरवास नैवेद्य नेते वेळीं त्यांत ११ वडे असावे लागतात.

पंचतीर्थी म्हणून एक विधि आहे. तो असा:—१. काशीच्या वरच्या बाजूस अशी नांवाचा एक घाट आहे. ह्या ठिकाणीं अशी नदीचा व भागीरथीचा संगम होतो. तेथें भागीरथीमध्यें स्नान करून श्राद्ध करावें लागतें. हें श्राद्ध कोणी प्रत्यक्ष ब्राम्हण बसवून करितात, कोणी चटश्राद्ध करितात, किंवा कोणी नुसतें पिंडदान करितात. २. अशीचे आलीकडे दशाश्वमेध नांवाचा घाट आहे. तेथेंही अशीचे घाटावरीलप्रमाणें श्राद्ध करावें लागतें. ३. तेथून काशीचे खालचे बाजूस शेवटील टोंकास वरुणासंगम नांवाचा घाट आहे. ह्या ठिकाणीं वरुणा नदीचा व भागीरथीचा संगम होतो. तेथेंही वरीलप्रमाणें श्राद्ध करावें लागतें. ४. ह्यापुढें पंचगंगा नांवाच्या घाटावर येऊन तेथें श्राद्ध करावें लागतें. ह्या घाटावर बहुधा सर्व लोक प्रातःकाळचें स्नान करितात. ५. अखेरीस मनिकर्णिकेच्या घाटावर श्राद्ध करावें लागतें. ह्या घाटावर बहुधा सर्व लोक मध्यान्हकाळीं स्नान करितात. ह्याप्रमाणें हीं पांचीं श्राद्धें कोणी एका दिवसांत करितात अथवा अशी व दशाश्वमेध हीं दोन एक दिवसांत करून दुसरे दिवशीं वरुणासंगम, पंचगंगा व मनिकर्णिका अशीं तीन श्राद्धें करितात. येणेंप्रमाणें पंचतीर्थी विधि आहे. मनिकर्णिकेजवळच थोड्या अंतरावर काशींतील प्रेतें जाळण्याची जागा आहे, त्यास महास्मशान असें म्हणतात. प्रेतें जाळण्याबद्दल डोंब लोक ती जागा आपली असल्यामुळें प्रेतें जाळणाराकडून कर घेतात. प्रेतें पुष्कळ असल्यास प्रेत सर्व जळूं न देतां तसेंच भागीरथींत लोटून देतात.

ह्यानंतर पिशाचमोचन म्हणून एक विधि करावा लागतो. दशाश्वमेधाच्या बाजूस..............नांवाचें एक तीर्थ आहे. तेथें पंचतीर्थीच्या रीतीप्रमाणें श्राद्ध करावें लागतें. कोणाच्या वंशांत प्रबळ पिशाच्च असल्यास त्याकरितां त्रिपिंडी नांवाचा एक विधि आहे, त्यांत दोन श्राद्धें करावीं लागतात.

काशींत देवदर्शन करण्याच्या जागा आहेत त्या येणेंप्रमाणें. १. काशीविश्वेश्वराचें देऊळ फार मोठें असून तेथें महादेवाची पिंडी आहे, ती सुमारें लहान कोहाळ्या एवढी गारेची आहे. त्यापुढें एक मोठा नंदी आहे. विश्वेश्वराच्या गाभाऱ्याच्या समोरच दंडपाणी नांवाचा एक महादेव आहे. विश्वेश्वराचे उजवे बाजूस एक मुक्तिमंडप ह्मणून जागा आहे. तेथें महादेवाच्या शेंकडों पिंड्या आहेत. त्याचे डावे बाजूसही महादेवाच्या पिंड्या व लहान लहान नंदी आहेत. विश्वेश्वराचें शिखर सोन्यानें मढविलेलें आहे. मुक्तिमंडपाच्या उजवे बाजूस ज्ञानवापी ह्मणून एक विहीर आहे. तेथें गिझनीच्या महमदाचे दंग्याच्या वेळीं विश्वेश्वर कांहीं दिवस राहिला होता असें म्हणतात. आणखी लोक असें म्हणतात कीं, महमदाच्या दंग्याच्या वेळीं विश्वेश्वराच्या देवळांतील विश्वेश्वराचें मूळचें लिंग ज्ञानवापींत कांहीं दिवस राहून हल्लीं मनिकर्णिकेंत आहे. ज्ञानवापीचे नजीक एक मोठा नंदी आहे. तो फार प्राचीनचा असल्याचा दिसतो. विश्वेश्वराच्या नजीक मोठा बाजार आहे. त्या बाजारांत तांब्याच्या, पितळेच्या तऱ्हेतऱ्हेच्या देवांच्या मूर्ति मिळतात; लोटया, झाऱ्या, गिंडया, चंबू, अबकारे, देव्हारे, पूजापात्रें, देवाचे पाळणे, तबकें, पेले, तांबे वगैरे जिनसा उत्तम पितळेच्या व तांब्याच्या व गंगाजमनी अशा मिळतात. तेथील नकशीचीं भांडीं व पाळणे फार सुरेख असतात.

पंचगंगेच्या घाटावर बिंदुमाधवाचें देऊळ आहे. बिंदुमाधवाची मूर्ति काळ्या दगडाची सुरेख केलेली आहे. ही विष्णुमूर्ति आहे. ह्या देवाचे बाजूस महादेवाची पिंडी आहे, व गंगेची मूर्ति पांढऱ्या दगडाची आहे. ह्या देव-

ळाचे खालचे बाजूस बद्रिनारायणाचें लहान देऊळ आहे. हीही मूर्ति काळे दगडाची असून चांगली केलेली आहे. रामनवमी इत्यादि जयंत्यांच्या दिवशीं बिंदुमाधवास त्या त्या देवाचीं रूपें देतात. बिंदुमाधवापासून थोड्या अंतरावर एक मशीद आहे. तीस दोन मोठाले मनोरे आहेत. त्या मनोऱ्यांवर लोक मौजेनें चढून जातात. व त्या मनोऱ्यांवरून सर्व काशी शहर दिसतें. बिंदुमाधवाची पूर्वीची जुनी मूर्ति काशींतच एका सावकाराचे घरीं आहे, त्याचें कारण असें सांगतात कीं, गिझनीच्या महमदाचे दंग्याच्या वेळीं ही मूर्ति त्या सावकाराचे स्वप्नांत जाऊन तिनें त्यास असें सांगितलें कीं, मला तुझे घरीं ने, ह्याचप्रमाणें पुजाऱ्यासही दृष्टांत झाला, त्यावरून पुजाऱ्यानें ती मूर्ति त्या सावकाराचे घरीं नेऊन ठेविली. थोड्या प्रयासानें ह्या मूर्तीचेंही दर्शन होतें.

ह्यापुढें दर्शन घेण्याचा देव धुंडिराज (म्हणजे गणपति) आहे. त्याचें देऊळ विश्वेश्वराचे देवळापासून थोड्याच अंतरावर आहे. धुंडिराजाचें देवळाजवळच अन्नपूर्णेचें देऊळ आहे. तेथें सुवासिनी स्त्रिया अन्नपूर्णेची पूजा करितात, व हस्तिदंती फणी व करंडा वाहतात आणि तेथील शकुनाची म्हणून एक लहान पातेली व एक पळी घेऊन येतात. ह्या देवळांत गाई फार गरीब व देखणाऊ आहेत.

पुढें दर्शन घेण्याचा देव दंडपाणी आहे. त्याचीं दोन स्थानें आहेत. एक विश्वेश्वराच्या गाभाऱ्या समोर व दुसरें भैरवाचे नजीक आहे. जो दंडपाणी आहे त्याचा झाडाच्या खोडाप्रमाणें खालीं आकार असून वरचे बाजूस तोंड आहे.

ह्यानंतर भैरवाचें दर्शन घ्यावयाचें. त्याचे बद्दल पूर्वीं सांगितलेंच आहे. नंतर वंदेकाशी म्हणून एक स्थान आहे. तेथें काशीच्या नगरीची देवी आहे. तिचें दर्शन घ्यावें लागतें. ह्या स्थानापासून जवळच एक गुहा आहे, त्या गुहेचें दर्शन घ्यावें लागतें. ह्यापुढें गंगेचें दर्शन घ्यावयाचें. नंतर अशीच्या घाटाजवळ भवानीचें देऊळ

आहे, तेथें जाऊन भवानीचें दर्शन घ्यावें. नंतर मनिकर्णिकेवर येऊन मनिकर्णिकेचें दर्शन घ्यावें. पुढें गंगापूजा करावी लागते. ही पूजा करितांना भागीरथीच्या उद्देशानें सूपवाण उपाध्यास द्यावें लागतें. ह्या वाणांत लुगडें-चोळी फणी-करंडा गरसोळ्या नारळ शक्त्यनुसार कांहींएक दागिना ह्याप्रमाणें पदार्थ असावेत. गंगेप्रीत्यर्थ ५ पासून १००० पर्यंत ब्राह्मणभोजन घालण्याची वहिवाट आहे.

काशींत महादेवाचीं लिंगें असंख्यात आहेत व तेथें सर्व ठिकाणचीं तीर्थें आहेत. काशींत शिवरात्रीचे दिवशीं मोठी यात्रा जमते. शैव लोकांचा तेथें मोठा भरणा आहे. काशी सभोंवतीं प्रदक्षिणा करण्यास पंचकोशी असें म्हणतात. पंचक्रोशीचा आरंभ मनिकर्णिकेपासून होतो. तो असा कीं, मनिकर्णिकेवर जाऊन तेथें स्नान करून पंचक्रोशी यात्रेचा संकल्प करावा आणि तेथून विनायकापर्यंत मौन धरून जावें. नंतर असीस जाऊन त्या तीर्थाचें वंदन करावें. त्यापुढें दुर्गेचें दर्शन करून कर्दमेश्वरीं जावें. तेथें स्नान पंचतीर्थीच्या रीतीप्रमाणें तीर्थश्राद्ध व कर्दमेश्वर महादेवाचें दर्शन करून एक दिवस मुक्काम करावा. दुसरे दिवशीं तीनचार कोसांवर भीमचंडी देवीचें स्थान आहे तेथें जावें. त्या ठिकाणीं तीर्थस्नान श्राद्ध करून व भीमचंडी देवीचें दर्शन करून एक दिवस मुक्काम करावा. भीमचंडीस बायकांना विटाळशी होऊन पंधरा दिवस झाले असल्यास तेथें विटाळशी होण्याची मोठी भीति असते. भीमचंडीहून चार कोसांवर रामेश्वराचें स्थान आहे. तेथें जाऊन वरुणानदींत स्नान करावें व पूर्वीप्रमाणें श्राद्ध करून रामेश्वराचें दर्शन घेऊन एक दिवस तेथें राहावें. ह्या पुढें सुमारें पांच कोसांवर कपिलधार तीर्थ आहे, तेथेंही स्नान, तीर्थश्राद्ध व कपिलेश्वर महादेवाचें दर्शन घेऊन एक दिवस मुक्काम करावा. पायीं जाण्याला हें ठिकाण बरेंच लांब असल्यामुळें कोणी मध्यें शिवपूर येथें मुक्काम करितात. शिवपुरास पांडवांच्या मूर्ति आहेत. कपिलधारेहून निघून सुमारें दोन कोसांवर जवविनायक लागतो.

तेथें जाऊन गणपतीपुढें जव ठेवावेत; आणि जव टाकीत टाकीत पंच-गंगेपर्यंत यावें, आणि मनिकर्णिकेवर जाऊन साक्षीविनायकाचें दर्शन करून त्यास यात्रा निवेदन करून पुनः मनिकर्णिकेवर श्राद्ध करावें. ह्यास पंचक्रोशीची यात्रा असें ह्मणतात.

ह्यानंतर गंगापूजा करावयाची ती अशी. गंगेवर जाऊन गंगेची षोडशोपचारांनीं पूजा करावी. गंगेला अभिषेक करावा. कोणी लोक रुद्राचें आवर्तन म्हणून अभिषेक करितात. कोणीं गंगेचें सूक्त म्हणून अभिषेक करितात. कोणीं गंगेस सहस्र फुलें वाहतात. गंगेप्रीत्यर्थ सूप-वाण द्यावयाचें त्यांत फणी करंडा बांगडया गहू नारळ खण अगर लुगडेंचोळी मंगळसूत्र व शक्ति असल्यास दागिना इतके पदार्थ सुपांत घालून तें तेथील आपल्या उपाध्यास द्यावें. शक्त्यनुसार पांचपासून हजारपर्यंत ब्राम्हणभोजन करावें.

कोणीं कोणीं बिंदुमाधवाची महापूजा पवमानाचा अभिषेक तुळशी सहस्रनाम व ब्राम्हणभोजनही करितात. तसेंच विश्वेश्वराची महापूजा रुद्राची एकादष्णी अथवा लघुरुद्र व ब्राम्हणभोजन करितात. काशींत ब्राम्हणभोजनास पुरणपोळी करण्याचा बहुधा सांप्रदाय नाहीं. ज्यास अगदी शक्ति नाहीं तो साखरपुऱ्या करवितो. काशींत मोतीचूर लाडूचें फार माहात्म्य आहे, व तेथें हे लाडू जसे होतात तसे कोठेंही होत नाहींत.

श्रीमंत लोक विद्वान ब्राम्हणांना भोजन घालून वसंतपूजा करितात. कोणी नुसती पानसुपारी मिठाई देऊन करितात. काशींत वैदिकांचा भरणा मोठा आहे. प्रायः ब्राम्हणभोजनास वैदीक बोलावितात. कोणी श्रीमंत लोक शास्त्री लोकांची सभा करितात. काशींत व्याकरण, न्याय, मीमांसा, ह्या विद्यांचा अभ्यास फार उत्तम प्रकारें चालतो. ह्या लोकांची सभा करून त्यांचे वादविवाद ऐकून विदादक्षिणा देण्याची चाल आहे. ह्याशिवाय कोणी कोणी तुळादान, गोसहस्र, दंपती पूजा करितात. कोणी यज्ञोपवीत करितात म्हणजे काशींतील सर्व ब्राम्हणांचें भोजन करितात.

काशींत एक सरकारी संस्कृत विद्यालय आहे. तेथें व्याकरण, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र, सांख्य, योग इत्यादि शास्त्रांचे पाठ चालले असतात. विद्यार्थ्यांना पगार असून सहासात वर्षें त्यांचें अध्ययन झाल्यावर त्यांच्या दोनतीन परीक्षा होऊन त्यांस बक्षिसें व दाखले देण्यांत येतात. ह्याशिवाय राजेरजवाड्यांनीं आपआपल्या खर्चांनीं संस्कृत पाठशाळा घातल्या आहेत. काशींत संन्याशांचा मोठा भरणा आहे. त्यामध्यें कांहीं वेदांतशास्त्रांत निपुण आहेत. कोणीं कोणीं अशीपासून वरूणेपर्यंत असलेल्या सर्व संन्याशांना पुढील बोलावितात. ह्यास अशीवरूणा असें म्हणतात. काशींत अन्नछत्रें बहुत आहेत. त्या सर्वांत बाजीराव पेशव्यांचे घाटावर बालाजीचे देवळांत बाजीरावानें घातलेलें अन्नछत्र मोठें आहे. काशींत निरशनाच्या फराळाच्या जिलब्या, लाडू, घीवर, इत्यादि पदार्थांचीं दुकानें आहेत.

## गया.

काशीहून गयेस जावें लागतें. वाटेंत सुवर्णभद्र ह्या नावांचा मोठा नद आहे. तेथेंही कोणीं तीर्थविधि करितात. त्यापुढें पुनःपुना नांवाची नदी लागते. तेथें तीर्थविधि केलाच पाहिजे. नंतर गयेस जावें. गयेस जातांना गयेंतील कोणी गयावळाचा मनुष्य बरोबर असतो. गयावळांनीं यात्रेकरू लोकांकरितां मोठमोठालीं मकाणें बांधून ठेविलेलीं आहेत, तेथें यात्रेकरू उतरतात. गयेस क्षौर व उपास ह्यांची जरूरी नाहीं. येथें गयावळ लोकांचा द्रव्याचा बोजा फार मोठा असतो म्हणून कित्येक लोक गयावळाशीं प्रथमच ठराव करून ठेवितात. गया श्राद्धाचे तीन प्रकार आहेतः—१. अष्टगया २. पंचगया व ३. एकोद्दिष्टगया. अष्टगया करण्याला ४७ श्राद्धें करावीं लागतात. गयेस फल्गू नदी असून तेथें फल्गूभेट दिली पाहिजे. पहिले दिवशीं फल्गूश्राद्ध करावें. हें श्राद्ध कोणीं ज्यास्त पैसे खर्च करून ब्राम्हण बसवून करितात व कोणी चटावर करितात. दुसरे दिवशीं सुमारें दोन कोसांवर ब्रम्हकुंड आहे तेथें जाऊन

श्राद्ध करावें. हें श्राद्ध कोणी ब्राम्हण बसवून करितात व कोणीं चटावर करितात, व कोणीं नुसतें पिंडप्रदान करितात. ब्रम्हकुंडाजवळ प्रेत-पर्वत नांवाची टेंकडी आहे. त्याजवर चढून जाण्याला पाहेऱ्या केलेल्या आहेत. ह्या पर्वतावर ब्रम्हकुंडाप्रमाणेंच श्राद्ध करावें लागतें. येथें धर्मपिंड ४४ द्यावे लागतात. ह्या पर्वतापासून एक कोस आलीकडे रामतीर्थ आहे. तेथेंही वरीलप्रमाणें श्राद्ध करून नंतर नजीक असलेल्या रामपर्वतावर जावें लागतें. प्रेतपर्वत व रामपर्वत ह्या दोहों ठिकाणीं सातूच्या पिठाचें दान करावें लागतें. रामपर्वताचे खालीं आल्यावर काकबळी द्यावा लागतो. ह्याप्रमाणें दुसरे दिवशींही करावें लागते. कोणी लोक सोयीसाठीं ब्रम्हकुंड व प्रेतपर्वत एक दिवस करून दुसरे दिवशीं रामतीर्थ रामपर्वत व काकबळी हे करितात. तिसरे दिवशीं गया शहरामध्यें उत्तर मानससरोवर आहे, तेथें जाऊन श्राद्ध करावें. उत्तर मानससरोवराहून निघून दक्षिण मानससरोवरास पोंचे तोंपर्यंत मौनव्रतानें असावें लागतें. ह्या दोन सरोवरांमध्यें कनखल नांवाचें तीर्थ आहे तेथेंही श्राद्ध करावें लागतें. नंतर दक्षिण मानसावर श्राद्ध करून त्याच्या पुढें उदीची नामक तीर्थ आहे तेथें श्राद्ध करावें लागतें. मग फल्गूजवळ जिव्हालोल तीर्थ आहे, तेथें श्राद्ध करावें. ह्या तिसऱ्या दिवसाच्या विधीला पंचतीर्थी असें म्हणतात. चवथ्या दिवशीं गयेपासून अडीच कोसांवर मातंगी म्हणून सरोवर आहे, तेथें श्राद्ध करावें. तेथून पाव कोसावर यूपकूप म्हणून जागा आहे, तेथें एक विहीर व एक लांकडी खांब आहे. त्या ठिकाणीं श्राद्ध करून त्या यूपकूपापासून सुमारें कोसभर आलीकडे महाबोधी ह्या नांवाचें पिंपळाचें झाड आहे. तेथें येऊन श्राद्ध करावें. ह्या झाडाजवळच बौद्ध लोकांचें अतिशय उंच शिखराचें देऊळ आहे. तेथें जैनधर्मी लोक येऊन श्राद्ध करितात. ह्या झाडाच्या एक कोसभर आलीकडे ब्रम्हसरोवर आहे. तेथें श्राद्ध करून काकबळी द्यावा लागतो. पांचवे दिवशीं विष्णुपदीं श्राद्ध करावें

लागतें. विष्णुपदाचें देऊळ फल्गूचे तीरावर आहे. ह्या देवळाजवळ गया गदाधराचें देऊळ आहे, तेथें अठरापदांचे खांब आहेत. विष्णुपदावर श्राद्ध ब्राम्हण बसवून करितात किंवा चटावर करितात, नुसतें पिंडप्रदान करीत नाहींत. ह्या ठिकाणीं धर्मपिंड ४४ देतात. सहावे दिवशीं अठरा पदांवर श्राद्धें करितात, तीं येणें प्रमाणेः-१. ब्रम्हपद, २. रुद्रपद, ३. कार्तिकेयपद, ४. दक्षिणाग्निपद, ५. आवसथ्याग्निपद, ६. गार्हपत्याग्निपद, ७. सभ्याग्निपद, ८. चंद्रपद, ९. सूर्यपद, १०. गणेशपद, ११. इंद्रपद, १२. मतंगपद, १३. कण्वपद, १४. अगस्तिपद, १५. दधीचपद, १६. क्रौंचपद, १७. कश्यपपद, व १८. विष्णुपद. सातवे दिवशीं दशाश्वमेध, मधुश्रवा, गयाकूप, गयाशीर, मुंडपृष्ठ, आदीगया, धौतपद, भीमजानू, गोप्रचार, रुक्मिणीतीर्थ, गदालोल, वैतरणी ह्या प्रत्येक ठिकाणीं श्राद्ध करावें लागतें, आणि गयाशीर येथें ४४ धर्मपिंड द्यावे लागतात. ह्या विधीस अष्टतीर्थ असें ह्मणतात. आठवे दिवशीं अक्षयवटश्राद्ध करावें लागतें. अक्षयवट म्हणून वडाचें झाड गया शहरा बाहेर जवळच आहे. त्या ठिकाणीं बहुतेक लोक श्राद्धभोजनासाठीं गयावळांना बोलावितात. कोणीं हें श्राद्ध चटावर करून पुनः दुसरा स्वयंपाक करून गयावळांना भोजनास घालितात. ह्या श्राद्धांत धर्मपिंड ४४ असतात. हें श्राद्ध संपतांना सर्व गयायात्रेचें साफल्य देण्यासाठीं गयावळ येतो, व साफल्य देतांना तो यात्रेकरूकडून निघेल तितकें द्रव्य काढण्याचा प्रयत्न करितो. त्या वेळेस तो गयावळ यात्रेकरूचे हात फुलांच्या माळेनें बांधून द्रव्य मागतो. दोघांच्या समजुतीनें रकम ठरल्यावर तो तीच माळ यात्रेकरूच्या गळ्यांत घालतो व " तेरे पितरकू स्वर्ग भये " असें म्हणून पाठ थोपटून त्याच्या कपाळास गंधाचा टिळा लावतो. ह्याप्रमाणें गयेंतील श्राद्धविधि संपतो.

श्राद्धास रोज लागणाऱ्या सामग्रीस खापर असें म्हणतात. ही सामग्री गयावळाच्या मार्फतीनें वाण्याकडून मिळण्याची तजवीज होते. खापराचे

तीन प्रकार आहेत. १. एकशेर तांदुळांचें, २. अच्छेर तांदुळांचें, ३. पावशेर तांदुळांचें. ह्यांत जिनसा असतात त्या येणेंप्रमाणें:-तांदूळ, सातूचें पीठ, तीळ, तूप, मध, साखर, पत्रावळी, मातीचीं बोळकीं, गंध, व हळदकुंकू. एक शेराचे खापरास आठ रुपये पडतात. हें खापर घेणाऱ्याला प्रेतपर्वतावरील बोंब्यास आठ रुपये द्यावे लागतात. हा बोंब्या सातूंचें दान घेतो व तेथें बोंब मारून “ तेरे पितरकु स्वर्ग भये ” असें म्हणतो. षोडशी म्हणजे श्राद्धाचे संकल्प सांगणाऱ्या ब्राम्हणास आठ रुपये द्यावे लागतात. फूलवाल्यास आठ आणे द्यावे लागतात. जागोजागीं होणाऱ्या श्राद्धाच्या जाग्याचे मक्तेवाल्यास पैसे द्यावे लागतात त्याची रक्कम सुमारें अडीच पर्यंत होते. चट केले असतां चटश्राद्धाची दक्षिणा व पिंडप्रदानाची दक्षिणा मिळून सुमारें दहा रुपये खर्च येतो. अशाप्रकारें खर्च करणाराकडून गयावळ निदान दोनशें रुपये घेतो. अच्छेराचें खापर घेणारास वाणी चार रुपये, बोंब्या चार रुपये, षोडशी चार रुपये, व गयावळ निदान शंभर रुपये ह्या प्रमाणें खर्च पडतो, व बाकीचा खर्च पूर्वीप्रमाणें. पावशेराचें खापर घेणारास वाणी दोन रुपये, बोंब्या दोन रुपये, षोडशी दोन रुपये, चटश्राद्धा बाबदचा खर्च सुमारें तीन रुपये, व गयावळ निदान पंचवीस रुपये ह्याप्रमाणें खर्च लागतो, व बाकीचा खर्च पूर्वीप्रमाणें. बहुतेक लहान खापर पतकरितात. प्रत्येक ठिकाणीं ब्राम्हण घालून श्राद्ध करणारास श्राद्धाचे संबंधाचा खर्च शंभर रुपये येतो. ह्याशिवाय अशा मनुष्यापासून गयावळ निदान तीनशें रुपयांची रक्कम घेतो. बहुतेक लोक ४७ श्राद्धांपैकीं ४४ श्राद्धें नुसत्या पिंडदानानें करितात, व ३ श्राद्धें मात्र चटावर करितात. सर्व श्राद्धें चटावर करण्यास बहुधा मध्यम किंवा मोठें खापर घ्यावें लागतें; व श्राद्ध चालविणाऱ्या ब्राम्हणासही निदान १० किंवा १५ रुपये दक्षिणा द्यावी लागते. ह्याप्रमाणें अष्टगयेचा प्रकार आहे.

मध्यगयेंत पहिले दिवशीं फल्गुभेट व फल्गुश्राद्ध; दुसरे दिवशीं

पंचतीर्थी, तिसरे दिवशीं विष्णुश्राद्ध व अठरापदें, चवथे दिवशीं अष्टतीर्थी व पांचवे दिवशीं अक्षयवट ह्याप्रमाणें करावें लागतें. पंचतीर्थींतही खापराचे तीन प्रकार असून किरकोळ खर्च सुमोर अष्टगयेच्या पाऊणपट पडतो. गयावळाची देणगी यात्रेकरूच्या शक्तीवर अवलंबून असते.

एकोद्दिष्टगयेंत पहिले दिवशीं फल्गुभेट व फल्गुश्राद्ध, दुसरे दिवशीं विष्णुश्राद्ध व तिसरे दिवशीं अक्षयवट करावा लागतो. ह्यांत खापराचा खर्च मुळींच पडत नाहीं. षोडशी यास निदान आठ आणे द्यावे लागतात. गयावळास जें द्यावयाचें तें निदान सात रुपये द्यावे लागतात. ह्यावर यात्रेकरूच्या शक्तीप्रमाणें देण्याचे असे.

गयेंत पुष्कळ तीर्थ आहेत, त्या सर्व ठिकाणीं श्राद्ध करणें अतिशय कठीण आहे. म्हणून त्या सर्वांबद्दल " न्यूनातिरिक्त परिपूर्ती " ह्या नांवाचें एक श्राद्ध करितात. ह्या श्राद्धाची रीति पूर्वी सांगितलेल्या तीर्थश्राद्धाप्रमाणें आहे.

संध्या करण्यांत नेहमी चुका होतात ह्या चुकांच्या प्रायश्चित्तासाठीं गयेंत गायत्रि, सावित्रि व सरस्वति अशीं तीन तीर्थें आहेत, तेथें एकाच दिवशीं प्रातःसंध्या माध्यान्हसंध्या करावी व सायंसंध्या करावी ती अशी. गायत्रीवर प्रातःसंध्या करावी, सावित्रीवर माध्यान्हसंध्या करावी व सरस्वतीवर सायंसंध्या करावी. प्रत्येक तीर्थाचे ठिकाणीं चुकलेल्या संध्येबद्दल निदान एकपासून तीनपर्यंत कृच्छ्रें सोडावीं लागतात. सावित्रि डोंगरावर आहे. तेथें पाहेऱ्या चढून जावें लागतें. तेथें डोंगरावर रुद्रयोनि व ब्रम्हयोनि म्हणून दगडांत दोन लहान लहान भोगदे आहेत. ते लांबीला सुमारें ९ हात आहेत, व तोंडाशीं दोन हात रुंद आहेत. ह्या प्रत्येक भोगद्यांत यात्रेकरू आडवे होऊन पायाकडून आंत शिरतात व त्यांतून सरपटत सरपटत बाहेर पडतात. एकादा मनुष्य फार लठ्ठ असल्यामुळें तेथें अडकल्यास त्यास ओढून काढितात ! ह्या दिवशीं उपोषण करावें लागतें.

ह्यापुढें एक दिवस विष्णुपदाची महापूजा एक हजारपासून एक

लक्षपर्यंत तुळशी वाहून करावी आणि नंतर फल्गु नदीची पूजा करून ब्राम्हणभोजन करावें. ह्याप्रमाणें गयेची यात्रा आहे. गयेंत गयराजानें यज्ञ केल्यामुळें गया असें नांव पडलें आहे.

## अयोध्या.

अयोध्या ही मूळची रामराजाची नगरी असून क्षेत्रही आहे. हें क्षेत्र शरयू नदीचे तीरीं आहे. ह्या नदीचें पात्र फार मोठें असून गंभीर आहे. येथें गोदावरी प्रमाणेंच सर्व तीर्थविधि स्वर्गद्वार घाटावर केला पाहिजे. अयोध्येंत बहुत राममंदिरें आहेत. त्या सर्वांची पूजाअर्चा करण्याची रीति उत्तम प्रकारें ठेविलेली आहे. त्रेतायुगांतील रामाच्या सोन्याच्या मूर्ति सुमारें दीड हात उंचीच्या आहेत. त्या मूर्तींचें दर्शन एकादशीस फुकट होतें, एऱ्हवीं माणशी १। रुपया कर पडतो. हणमंत-गढी म्हणून एक देऊळ आहे. तेथें हनुमान सिंहासनावर बसल्याचें दृष्टीस पडतें. ह्या ठिकाणीं मोठा बाजार आहे. काळ्या रामाचें एक देऊळ आहे तेथें बहुत दक्षिणी लोक पूजा करितात. अयोध्येंत विशेष एवढें आहे कीं, रामाची महापूजा करून तुळशी सहस्रनाम वाहून यथाशक्ति ब्राम्हणभोजन करावें, व रामाचीं मुख्य मुख्य सुमारें दहा मंदिरें आहेत तेथें जाऊन देवदर्शन करावें. ह्या गांवीं माकडांचा उपद्रव फार आहे.

## ब्रम्हवर्त.

कानपुरापासून सात कोसांवर ब्रम्हावर्त म्हणून एक क्षेत्र आहे तेथें भागीरथीनदी आहे. जे लोक काशीहून अयोध्याच्या मार्गानें येतात ते ह्या ठिकाणीं भागीरथीच्या पाण्यानें कळस भरून घेतात. येथेंही गंगापूजा व ब्राम्हणभोजन करितात. तेथून जवळच वाल्मिक ऋषीचा आश्रम आहे. तेथें सीतेची प्रसूत होण्याची जागा व लवकुशाचे खेळण्याची जागा दृष्टीस पडते. ब्रम्हावर्त हें शांत स्थळ आहे.

## मथुरा.

मथुरा क्षेत्र यमुनानदीचे कांठीं आहे. यमुनानदी गंभीर असून तींत अनेक प्रकारचे प्राणी आहेत. येथें विश्राम घाटावर क्षौर व तीर्थविधि करावे लागतात. येथें कृष्णाचीं मंदिरें पुष्कळ ह्मणजे सुमारें ५००० आहेत. पूजा करण्याची व्यवस्था अयोध्येपेक्षां चांगली आहे. येथें द्वारकाधीशाचें मुख्य मंदीर आहे. हें मंदीर फार मोठें असून सकाळीं व संध्याकाळीं देवदर्शनास लोकांचा मोठा जमाव जमतो. येथील देवास सर्व प्रकारचे राजोपचार होतात. येथील सर्व देवळांत देवांचें दर्शन हमेश होत नसून नेमिलेल्या वेळीं होतें. संध्याकाळीं विश्राम घाटावर यमुना देवीची आरती होते. तेव्हां तेथें हजारों लोक जमतात. बहुतेक लोक फुलांची परडी घेऊन कृष्णाच्या मूर्तीस व यमुनेस फुलें वाहतात. तसेंच खापराच्या पणतींत दिवे लाऊन यमुनेंत सोडितात. संध्याकाळीं यमुनेच्या कांठीं विश्राम घाटावर पुष्कळ कांसवें जमतात. त्यांना लोक फुटाणे टाकितात. आरतीच्या वेळीं पुष्कळ लोक यमुनेवर फुलांचा वर्षाव करितात. तेथून जवळच वराहा देवाचें स्थान असून त्यांत वराहा मूर्ति आहे. लोक असें म्हणतात कीं, ही मूर्ति पूर्वीं कुबेराजवळ असून ती रावणाजवळ आली. रामानें रावणास मारिलें तेव्हां ती अयोध्येस आणिली. नंतर शत्रुघ्नानें लवणासुरास मारिल्यावर ती मूर्ति रामाजवळून त्यानें मागून घेऊन मथुरेस आणून स्थापिली. मथुरा नगरीस प्रदक्षिणा करण्याची वहिवाट आहे. तो प्रकार असा कीं, विश्राम घाटाहून निघून सूर्यतीर्थावर जावें, तेथें आचमन व वंदन करून ध्रुव घाटावर जावें, तेथें वंदन करून टेकडीवर ध्रुवाची मूर्ति आहे त्याचें दर्शन घ्यावें, पुढें कुब्जेचें स्थान आहे, तेथें कृष्णाचें दर्शन घ्यावें, पुढें कृष्णानें कंसास मारिलेली जागा आहे ती पाहून महादेवाचें दर्शन घेऊन अक्रूर व उद्धव ह्यांचें दर्शन घेऊन वसुदेव व देवकी ह्यांच्या बंदीखान्याची जागा व कृष्णाचें जन्मस्थान हीं

परत विश्राम घाटावर यावें. मथुरा हें क्षेत्र मागील सर्व क्षेत्रांपेक्षां रम्य दिसतें. घरांचीं रचना फार सुरेख आहे. बहुतेक मंदिरांत संगमरवरी दगडांच्या कोरीव जाळ्या, तऱ्हेतऱ्हेचीं चित्रें व सभोंवतीं लहान बाग असें दृष्टीस पडतें. बडे दाऊजी म्हणून बळदेवाचें स्थान आहे तेथील पूजेची व्यवस्था गोसावी महाराज ह्यांचे ताब्यांत आहे. ह्या गांवीं दूध, दहीं, पेढेबर्फी, खव्याचे लाडू, खव्याच्या करंज्या, मलई, राबडी, इत्यादि पदार्थ फार उत्तम प्रकारचे आहेत. येथें पितळेचीं तऱ्हेतऱ्हेचीं भांडीं, पूजापात्रें, नकशीचे देव्हारे, अपकरे, झाऱ्या, उत्तम प्रकारच्या मिळतात. तसेंच जाळीच्या टोप्या, सदरे, दुपेटे, चांगले आहेत. अयोध्येहून मथुरेस आगगाडींतून जाण्याला सुमारें सबंध एक दिवस लागतो.

## गोकूळ.

मथुरेपासून गोकूळ सुमारें तीन कोस आहे. सुमारें दीड कोस गाडी जाते तेथें यमुनानदी उतरल्यावर पुढें वाळू असल्यामुळें पायीं जावें लागतें. गोकुळास नंदाचा घाट आहे. तेथें स्नान करून नंदाच्या वाड्यास कृष्णदेवाचें दर्शन घ्यावें. नंद व यशोदा ह्यांच्या मूर्ति आहेत व पुढें पाळण्यांत कृष्णाची मूर्ति आहे. नंद व यशोदा ह्यांच्यापुढें कृष्ण व बळराम ह्यांच्या मूर्ति आहेत. यात्रेकरूस तेथील पूजारी पाळणा हालविण्यास सांगतो व हिंदुस्थानी भाषेंत देवाचें स्तोत्र म्हणण्यास सांगतो. त्या वाड्यांतच जिवती, उखळी, रवी, डेरा, इत्यादि पदार्थ दाखवितात. येथें सदावर्त, पूजा व गोग्रास ह्यांबाबद कांहीं द्रव्य द्यावें लागतें. नंतर जवळ वसुदेव व देवकी ह्यांचा वाडा आहे, तेथेंही कृष्ण व बळराम ह्यांचें दर्शन घ्यावें लागतें. गोकुळापासून एक कोसावर रमणरेति म्हणून वाळवंट आहे. तेथें वाळूचे मोठमोठाले ढीग असून वाळू अतिशय मऊ व चमकणारी आहे. यात्रेकरू लोक त्या ढिगावरून गडबडां लोळत जातात, व उपाध्यानें सांगितल्याप्रमाणें कांहीं रेघा व मंडळें काढून दहीं हातावर घेऊन पितात. गोकुळापासून सुमारें एक कोसावर

राधकेचा गांव आहे, व तीन कोसांवर बळरामाचें स्थान आहे तेथें बळरामाची मूर्ति एक पुरुष उंचीची आहे. तेथें यात्रेकरू जाऊन देवास लोणी व खडीसाखर ह्यांचा नैवेद्य दाखवितात, व पूजा आणि ब्राम्हण-भोजन शक्त्यनुसार करितात. नंतर यात्रेकरू गोकुळाच्या वाटेनें मथुरेस परत येतात.

## वृंदावन.

मथुरेपासून सुमारें साडेतीन कोसांवर वृंदावन हा गांव यमुनेच्या कांठीं आहे. तेथें कृष्णाचीं मंदिरें बहुत आहेत. चार घाटावर स्नान करून वस्त्रदान करण्याचा सांप्रदाय आहे. नंतर रासमंडळाचे जागेचें दर्शन घेऊन कुंजवनास जावें. तेथें लहान लहान अशीं फार जुनाट झाडें आहेत. एका प्रकारचे झाडाला शालिग्राम चिकटल्यासारखे दिसतात. ललिताकुंड म्हणून एक विहीर आहे, तेथें राधाकृष्णाचें मंदीर आहे तिकडे दर्शनास जावें. मग कालिया मर्दनाचें देऊळ आहे, तेथें दर्शन घ्यावें. वृंदावनांत एका श्रीमान सावकारानें राधाकृष्णाचें एक मंदीर नुसत्या संगमरवरी दगडाचें बांधिलें आहे. तेथें संगमरवरी दगडाचेंच कारंजें पुढें असून उत्तम बाग आहे. खांबाची रचना नागमोडी आहे. ह्या मंदिरांत वारंवार मोठमोठाले दीपोत्सव होतात. गांववाले ह्यास शेटजीचें मंदीर असें म्हणतात. रंगाचार्य यानें श्रीरंगाचें देऊळ बांधिलें आहे. त्यांत मध्यें श्रीरंगाची मूर्ति असून सभोंवतीं दक्षिण देशांतील सर्व देवांचीं मंदिरें आहेत. ह्या देवळांत फाल्गुनमासीं ब्रम्होत्सव होतो. तेव्हां दहा दिवस दहा प्रकारच्या वहनावर बसून देव बागेंत जातात. शेवटीं रथोत्सव होतो. ह्या वेळीं गांवोगांवचे हजारों लोक जमतात. एक दिवस दारूकाम चांगलें सुटतें, बाजार मोठा भरतो, व मल्लांच्या कुस्त्या होतात. केशी दैत्याला मारलेला एक केशी घाट आहे, तेथ यमुनेच्या स्नानाचें फार माहात्म्य असल्यामुळें लोक तेथें जाऊन स्नान करितात.

वृंदावन व मथुरा ह्यांच्यामध्यें अक्रूर घाट आहे, तेथेंही लोक स्नान करतात. ह्याप्रमाणें वृंदावनची यात्रा करून लोक मथुरेस परत येतात.

### गोवर्धन.

मथुरेहून सुमारें सात कोसांवर गोवर्धन हा गांव आहे. तेथें एक तीर्थ आहे, त्यांत गोवर्धनधारी कृष्णाची मूर्ति असून तिचें दर्शन व पूजा करावी लागते. बळिरामाचें एक स्थान आहे, तेथें दर्शन घेऊन पुनः मथुरेस परत येतात. अखेरीस मथुरासोडते वेळीं लोक तेथील पेढे प्रसाद म्हणून घेतात.

ह्या नंतर अतिशय पवित्र व परमार्थसाधनाला अतिशय उपयोगी अशीं गंगोत्री, केदार, व बदरीनारायण ह्या त्रिस्थलीची यात्रा करण्यास लोक आगगाडीनें हरिद्वारास जातात.

### हरिद्वार*

**हरिद्वारास** मायापुरी असें म्हणतात. येथील सर्व वस्ती गंगेच्या एका कांठास असून दुसरे बाजूला डोंगराची रांग आहे. ह्या ठिकाणीं बेलाचीं व पारिजातकाचीं झाडें फार आहेत. तेथें गंगेस मोठा घाट बांधिला असून **हरिद्वार**, **गंगाद्वार**, **स्वर्गद्वार**, **मोक्षद्वार**, अशीं तीर्थें आहेत. तेथून जवळच **कुशावर्त तीर्थ** आहे. तेथून जवळच **विष्णुतीर्थ** आहे. हरिद्वारास गोसावी व बैरागी ह्यांची वस्ती असून त्यांचीं ठाकुरद्वारें आहेत. ह्या ठिकाणीं क्षौर, श्राद्ध, ब्राम्हणभोजन इत्यादि कृत्यें करावीं लागतात. हरिद्वारापासून दोन मैलांवर **दक्षेश्वर** नांवाचें लिंग दक्षानें स्थापित केलेलें आहे. तेथें दक्षानें केलेल्या यज्ञाचें अग्निकुंड जेथें होतें तेथून अजूनही भस्म निघतें, आणि यात्रेकरी तेथून भस्म आणितात.

---

* हें शहर दिल्ली प्रांतांपैकीं साहारणपूर जिल्ह्यांतील असून दिल्लीपासून ईशान्य दिशेस ११७ मैलावर आहे. ह्याचे उत्तर अक्षांश २९° ५६ पूर्वरेखांश ७८° १८. रेखांश ग्रीनिच शहरापासून मोजावें. हें शहर समुद्राचे सपाटीपासून १०५० फूट ऊंच आहे.

येथें कनखल तीर्थ आहे. येथून दीड कोसावर बिल्वतीर्थ असून तेथें बिल्वेश्वर महादेव आहे. येथून दीड कोसांवर नीलगंगा म्हणून गंगेचा मोठा ओघ आहे. त्याचे जवळ नीलपर्वत म्हणून लहान डोंगर आहे, त्याचेवर श्रीचंडीदेवी आहे. पर्वताचे खालीं नीलेश्वर महादेव व पलीकडे थोड्या अंतरावर गौरीशंकर महादेव अशीं दोन स्थानें आहेत. येथील गंगेत पुष्कळ तांबडे मासे आहेत.

## गंगोत्री.

हरिद्वाराहून यात्रेकरू लोक आपल्या मर्जीप्रमाणें गंगोत्रीस किंवा केदारास किंवा नारायणास जातात. प्रथम अमुकच ठिकाणीं जावें असा नियम नाहीं. येथून गंगोत्रीस जाण्यास सुमारें पंधरा दिवस लागतात. ही सर्व वाट पायांनीं चालावी लागते. कोणी कोणी करंडींत बसून जातात. वाटेमध्यें म्हणण्यासारखीं गांवें लागत नाहींत. बरेच मुक्काम रानांत करावे लागतात. वाटेनें उतरण्यास चट्ट्या आहेत. कोठें कोठें वाट एक मनुष्य जाण्यापुरती असून जर पाय निसरून मनुष्य पडला तर खोल दरींत किंवा गंगेचे पाण्यांत पडून तो वांचावयाचा नाहीं. उतारूलोकांना मुगांची डाळ, तुरीची डाळ, तांदुळ, कणीक, तूप, साखर, व चुना मिसळलेल्या गुळाच्या गोळ्या हे जिन्नस मिळतात. सरपण फुकट मिळतें. हे जिन्नस टेरी राजाचे हुकुमानें ठिकठिकाणीं व्यापारी लोक शेळ्यांचे पाठीवर घालून नेतात. प्रत्येक शेळीवर सुमारें तीन पायली धान्य जातें. डोरीचट्टी येथें पाणचक्की आहे. डेराछावणी येथें इंग्रजांचें लष्कर असून पोस्ट आहे. पुढें राजपूर लागतें. येथून जवळच एक आडरस्ता आहे, परंतु ती वाट चांगली नसल्यामुळें तेथील अंमलदार तिकडून जाऊं देत नाहींत. म्हणून वांकडें घेऊन उजवे हातचे रस्त्यानें जावें लागतें. येथून पोळ्याची दांडी चढून गेल्यावर उत्तरकाशी हा गांव लागतो. तेथें धर्मशाळा आहे. पुढें भटारी गाव लागतो. तेथें सरकारी बंगला आहे. टेरीराजाचा ठाणेदार तेथें राहतो. पुढें बहिरवघाटी हा चढाव

चढून जावा लागतो. त्या ठिकाणीं बहिरवझुला फार भयंकर आहे. चढून गेल्यावर उत्तर अक्षांश ३०° ५९' ग्रीनिच पासून पूर्व रेखांश ७८° ५६' व समुद्राचे सपाटी पासून १००७३ फूट उंचीवर गंगोत्री आहे. तेथें गंगेचे पात्रांत गंगेचें लहान देऊळ आहे. तें मनुष्यांनीं बांधल्याचें दिसतें. यात्रेकरूस उतरण्यास धर्मशाळा आहेत. तेथें अहिल्याबाईच्या तीन धर्मशाळा आहेत. भागीर्थीचें पात्र सुमारें १०० फूट रुंद असून पाण्याचा प्रवाह सुमारें ३०।४० फूट रुंदीचा असतो. बर्फ वितुळेल त्याप्रमाणें नदीचें पाणी कमजास्त होतें व तें इतकें गार असतें कीं, त्यांत बोट बुचकळलें तर विंचू चावल्याप्रमाणें वेदना होतात. निरनिराळ्या ठिकाणीं जशी हवा असेल त्याप्रमाणें निरनिराळ्या वनस्पति व प्राणी आहेत. मांजरें, कुत्रीं, चिमण्या, कावळे इत्यादि नाहींत. धनगराचा मात्र एकादा मोठा कुत्रा आंगावर पुष्कळ केंस असलेला आढळतो. पुढें उत्तरेकडचा रस्ता बंद आहे. कारण बर्फ फार असून त्याजवरून चाललें तर मनुष्य थंडीनें मरेल. ह्या प्रदेशांत देवदारूचीं अतिशय उंच झाडें आहेत. डोंगर बर्फानें आच्छादिलेले असून चांदणें पडतें तेव्हां रुपेरी डोंगर आहेत असें दिसतें. येथें तीर्थविधि करितांना क्षौर करणें तर फक्त डोकीला दर्भ लावितात, व पिंडदान करितात. गंगेची पूजा लुगडें चोळी देऊन करितात व तेथील पुजारी पंडे आहेत त्यांचें भोजन करितात. येथें आश्विनापासून वैशाखपावेतों थंडी व बर्फ फार असल्यामुळें कोणी लोक राहात नसून हरिद्वारास परत येतात.

## केदार.

हरिद्वारापासून केदारास जाण्याला सुमारें पंधरा दिवस लागतात. रस्ता फारच वाईट असून कडे तुटलेले आहेत. वाटेंत सुंठ, बेदाणा, मनुका, साखर, खडीसाखर वगैरे जिनसा मिळत नसल्यामुळें लोक हरिद्वाराहून किंवा श्रीनगराहून नेतात. फक्त तांदूळ, कणीक, तूप, सरपण, क्वचित मुगांची व उडदांची डाळ हीं जागोजागीं मिळतात.

बटाटे वगैरे इकडील भाज्या मिळत नाहींत, परंतु तिकडील एक प्रकारची पालेभाजी मिळते, ती खाण्यास चवदार लागते. वाटेंत उतरण्याला जागोजागीं गवती झोंपड्या आहेत त्यांस चट्टी म्हणतात. येथें उतरण्याला एवढीच अट असते कीं, ज्याचे चट्टींत उतरावें त्याचे-कडून शिधा विकत घेतला पाहिजे. दूध व दहीं फारसें मिळत नाहीं. येथील उपाध्यांना नंबुरा असें म्हणतात.

हरिद्वारापासून पुढें गाडी, घोडेंही जाण्याचा रस्ता नाहीं. तेथें पाळण्याप्रमाणें **झंपाण** असते. त्यांत एक मनुष्य बसून चार माणसें वाहून नेतात, अथवा लांबोडी टोपलीसारखे वेळूची **कंडी** असते, तींत मनुष्य बाहेर पाय सोडून व नेणाराच्या पाठीकडे पाठ करून बसतो व त्या पहाडावरील लोक ती कंडी पाठीशीं बांधून नेतात; तथापि ह्या सोयीपासून फारच त्रास होतो, व पायानें बरेंच लांब जावें लागतें. वाटेंत हरिद्वारापासून बारा कोसांवर **कुब्जामृकतीर्थ** लागतें, तेथें भागीरथीचें पाणी फारच स्वच्छ असून मोठ्या जोरानें वहातें. तेथें आंब्याचें झाड फार जुनें आहे त्यास एकादे वेळीं फळ येतें तें ज्यास मिळतें तो दैव-वान समजतात. पुढें कांहीं अंतरावर **तपोवन** लागतें. तेथें बहुत बैरागी आहेत. येथें गंगेचें पाणी फार खोल असून फार जोरानें वहातें. येथें **लक्ष्मणाची** चांगली मूर्ति आहे. येथें गंगा वलांडून जाण्यास सोय केली आहे तीस **लक्ष्मणझुला** असें म्हणतात. सर्व झुल्यामध्यें हा फार मोठा आहे. झुला बांधण्याची रीति अशी आहे कीं, गंगेच्या एका तीरापासून दुसरे तीरापर्यंत मोठ्या व बळकट अशा दोन दोऱ्या झाडाला किंवा दगडाला बांधतात व त्याचे खालीं सुमारें थोड्या अंतरा-वर तशाच दोन दोऱ्या बांधितात. मग खालच्या दोऱ्यांत त्याचे पिळाम-ध्यें चारचार बोटें अंतरानें लांकडें बसविलेलीं असतात. ह्यावरून जाणें म्हणजे वरील दोऱ्या हातांनीं धरून खालचे दोऱ्यांत जीं लांकडें असतात त्यावर पाय ठेवून फार सावधगिरीनें हळू हळू पुढें पाय टाकीत व हात

धरीत जावें. पुढें **देवप्रयाग** क्षेत्र लागतें. तेथें गंगोत्रीकडून आलेली भागीरथी व बदरीनारायणाकडून आलेली अलकनंदा ह्या दोन नद्यांचा संगम झाला आहे. त्याचे जवळ गुहेंत राहून शंकराचार्यांनीं ब्रम्हसूत्रावर भाष्य केलें असें लोक म्हणतात. तेथून नजीकच एक टेंकडीवर रामचंद्राचें देऊळ आहे. त्याचें दर्शन घेणाराकडून पुजारी कर घेतात. ह्या क्षेत्रीं **वागीश्वर** नांवाचें शिवलिंग आहे. ह्या पुढें **श्रीनगर** क्षेत्र आहे.

**श्रीनगर** हें हिमालयाच्या पहाडांतील मोठें शहर आहे. येथील लोक सुंदर गोऱ्या रंगाचे असून ते लोंकरीचे कपडे वापरतात. बायका लोंकरीचें जाड कापड नेसतात, व पदर खोंचण्याला दाभण टोंचतात. यात्रेकरूंना तांदूळ, उडदाची डाळ, कणीक, अशा जिनसा मिळतात. लोक मुसलमानी भाषा समजतात व बोलतात. चांगलें तांदूळ म्हणण्यास ‘बासमतिचावल’ म्हणतात. त्यांची स्वताची भाषा निराळी आहे. ह्या मुलुखांत व्यापाराच्या जिनसा लहान गोण्यांत घालून शेळ्या व बोकड ह्यांवरून नेतात. कारण तेथें रस्ता अरुंद व वाईट असून दुसरें जनावर जाण्यासारखें नाहीं. ह्या क्षेत्रीं शंकराचार्यांनीं श्रीयंत्र स्थापन केलें आहे. तेथें **कमलेश्वर** महादेव मुख्य देवता आहे. येथील राज्य पूर्वी शंकराचार्यांनीं स्थापन केलें असें म्हणतात. ह्या शहराजवळ हिमालयपर्वताच्या **इंद्रकील** नांवाच्या शिखरावर **भिल्लकेदार** म्हणून एक शिवस्थान आहे. तेथें **शिवगंगानदी** आहे. अर्जुनाला पाशुपत अस्त्राचा उपदेश करण्यासाठीं भिल्लाचें रूप घेऊन शंकर आले ह्यास्तव भिल्लकेदार असें नाव पडलें आहे. येथें बेलाचीं झाडें आहेत व केदारनाथापाशीं बेल मिळत नसल्यामुळें यात्रेकरू येथून बेल केदारेश्वरास वाहण्यासाठीं नेतात. पुढें जवळ **क्रौंचपर्वत** असून त्याचे पुढें **रुद्रप्रयाग** आहे. ह्या ठिकाणीं मंदाकिनी व अलकनंदा ह्यांचा संगम होतो. तेथें जवळच **रुद्रेश्वर** आहे तेथें पिंडदान केलें तर पितर रुद्रलोकीं जातात. ह्यापुढें **कुंभारचट्टी** म्हणून

एक गांव आहे त्यास **कूर्मक्षेत्र** म्हणतात. तेथून सुमारें दोन कोसांवर **ध्यानबदरी** म्हणून नारायणाचें स्थान आहे. पुढें **गुप्तकाशी** नांवाचें ठिकाण असून तेथें **काशीविश्वेश्वर** देव व **मणिकर्णिकातीर्थ** आहे. ह्या क्षेत्राविषयीं असें म्हणतात कीं, कलियुगांत फार पाप होऊन काशी क्षेत्राचें महात्म्य नाहींसें होईल, तेव्हां ह्या क्षेत्रीं पापी लोकांचा उद्धार होईल. ह्यापुढें **नारदकोटी** म्हणून गांव आहे. तें नारदाचें गांव असून तेथें **नारदतीर्थ** आहे. तेथें डोंगराचे एका शिखरावर **त्रियुगीनारायणाचें** ठिकाण आहे. तेथील अग्नि तीन युगांतला असल्यामुळें त्यास त्रियुगीनारायण असें नांव पडलें आहे. हा अग्नि शिवपार्वतीचे लग्नापासून जसाचा तसाच कायम आहे असें म्हणतात. नारायणाच्या नाभींतून पाणी येतें. देवळाबाहेर **ब्रम्हतीर्थ, विष्णुतीर्थ, रुद्रतीर्थ** अशीं तीन तीर्थें आहेत. ह्यांपैकीं एकांत साप असून ते चावत नाहींत. त्यांत स्नान करून तेथील अग्नींत तिळांचा होम करितात. येथून हिमालय पर्वताचा देखावा फार उत्तम व शोभिवंत दिसतो, तेणेंकरून मनाला फार आनंद व आश्चर्य वाटतें. तेथून पुढें **गौरीतीर्थ** असून त्याचें पाणी कढत आहे. त्या पाण्याची जी वाफ होत असते ती दुरून धुराप्रमाणें दिसते. येथें तीर्थविधि करितात. तेथून पुढें बारा कोसांवर केदारेश्वर असून वाटेंत बर्फ आढळतें. तिकडे बर्फांत वाढणारीं फुलझाडें आहेत. बर्फांत कमळाचीं झाडें आहेत, त्याचें फूल एक हात घेराचें असून पांकळ्या पुष्कळ असतात. ह्या ठिकाणीं मंदाकिनी वलांडून जाण्यासाठीं बर्फावर लांकडें टाकिलेलीं असतात, त्यास '**सांगा**' म्हणतात. नदी उतरून गेल्यावर चोंहो बाजूंस उंच पर्वत व मध्यें मैदान असून त्यांत उत्तर अक्षांश ३०° ५३' पूर्व रेखांश ७९° १८' येथें **केदारनाथाचें** देऊळ असून त्याचे आठ दिशांस आठ तीर्थें आहेत. ह्या देवळाला शिखर नाहीं. ह्याचा घेर फारच मोठा व जुनाट आहे. ह्याचा आकार कोल्हापुरचे अंबाबाईचे देवळासारखा आहे, परंतु लहान आहे,

तथापि दोन अडीच पुरुष उंच आहे. देवळांत पायाचे घोट्याइतकें बर्फाचें पाणी असतें. बाहेर मंडपांत दुसरे देव असून मुख्य देवळांत केदारेश्वर आहे, तो लिंगाकार नसून मोठा रेडा बसल्याप्रमाणें असून मागच्या बाजूस शेपटाप्रमाणें आकार दिसतो. लोक मोठ्या कष्टानें जाऊन देवाचें दर्शन घेऊन बेल वाहून त्याला भेटतात. तेथें फार थंडी असल्यामुळें यात्रेकरू फार दिवस राहात नाहींत. येथें रेतोदक नांवाचें तीर्थकुंड असून त्याचे तळाशीं पारा आहे. उपाध्या कांहीं मंत्र म्हणण्यास सांगून त्या तीर्थाचे बारा घोट पाणी पिण्यास सांगतो. त्या दिवशीं उपोषण करावें लागतें. येथील यात्रा सहा दिवसांची किंवा तीन दिवसांची आहे. थंडी, धुकें, बर्फ, फार असल्या कारणानें तेथें राहण्यास फारच त्रास होतो. पांघरूणें वाळत नाहींत, सबब धाबळ्या वापरतात. कैलासभूमींत परसाकडे बसत नाहींत, म्हणून सकाळीं उजेडल्यावर मंदाकिनीचा सांगा उतरून पलीकडे शौचास जातात. मंदाकिनीचें स्नान करण्याचा प्रकार असा. पाण्यांत बर्फ असल्यामुळें कपडे लवकर भिजत नाहींत व गार पाण्यांत उभें राहावत नाहीं, सबब स्नान करणारा ओलें वस्त्र नेसून नदीचे कडेला बसतो व दुसरा मनुष्य घागरीनें पाणी त्याचे अंगावर ओतितो, तेव्हां स्नान करणारा थंडीनें फारच खुडखुडून बेसावध होतो, तेव्हां दुसरीं माणसें त्याला उचलून नेऊन आगटीवर धरून शेकतात, मग तो सावध होतो. येथें केदारेश्वर देवाचें दर्शन, मंदाकिनीचें स्नान व रेतोदकाचें पान एवढेंच करावें लागतें. द्राविड देशांतील लिंगाईत हे पुजारी आहेत. यात्रेकरू देवाला लोणी किंवा तूप लावून हात फिरवितात. केदारेश्वराचे आग्नेयी बाजूनें एक वाट पहाडांत जाते, त्या वाटेनें जाऊन देहत्याग केल्यास कैलास प्राप्त होतो असें म्हणतात. त्या वाटेनें कोस दोन कोस गेलें असतां बर्फांत शरीर पडतें अथवा मोठाले पक्षी उचलून नेऊन खातात असें म्हणतात. ह्या प्रदेशांत कार्तिक महिन्यापासून बर्फ पडूं लागतो; सबब

तेथील पुजारी केदारेश्वराचें दार पौर्णिमेपासून बंद करून **गुप्तकाशी**-नजीक **उखीमठ येथें** येऊन राहातात. येथें महादेवाचें लिंग आहे, त्याची पुजा केली असतां केदारेश्वरास पावते असें म्हणतात. पुढें वैशाख महिन्यांत बर्फ वितळूं लागला ह्मणजे लोक केदारेश्वरास जाऊन तेथील बर्फ काढून देवाचें दार उघडितात.

## बदरीनारायण.

केदाराहून बदरीनारायणास जाण्याची वाट **गुप्तकाशी**वरून फुटते ती **उखीमठा**कडे जाते. उखीमठापासून जवळच **अगस्त्याश्रम** असून जवळ **वैतरणी** नदी आहे. पुढें वाटेवर **तुंगनाथ** नांवाचा पर्वत असून तेथें तुंगगंगा नांवाची लहान नदी आहे. तिचे कांठीं लहान देवळांत **तुंगनाथाचें** लिंग आहे, व मागें **शंकराचार्यांची** मूर्ति आहे. पुढें **कर्णप्रयाग** आहे. तेथें **कर्णगंगा** व **अलकनंदा** ह्यांचा संगम आहे. तेथें स्नान व पितृतर्पण करावें. तेथून पुढें **नंदप्रयाग** लागतो. येथें **नंदगंगा** व **अलकनंदा** ह्यांचा संगम आहे. येथेंही स्नान पितृतर्पण करावें. पुढें **पिंपळचट्टी** नांवाच्या गांवावरून गेलें असतां **गरुडगंगा** नांवाची नदी लागते. तिच्या कांठीं गरुडाची मूर्ति आहे. येथून पुढें बदरिकाश्रमाचा प्रदेश सुरू होतो. पुढें **व्यासाचा आश्रम** असून तेथें **व्यासगंगा** नदी आहे. त्याचे पुढें **जोशीमठ** म्हणून एक ठिकाण आहे. हा मठ शंकराचार्यांचा असून त्यांत त्यांचे शालिग्राम आहेत. तेथून पुढें एक कोसांवर **विष्णुप्रयाग** आहे. तेथें **विष्णुगंगा व अलकनंदा** ह्यांचा संगम आहे. त्यांच्या ओघाचा जोर व भयंकर शब्द ऐकून पहाणारांस फार आश्चर्य वाटतें. स्नानाची जागा फार अवघड असून साखळदंड धरून खालीं उतरून स्नान करावें लागतें. पुढें **पंडुकेश्वर** येथें **वैखानसतीर्थ** आहे. त्या ठिकाणीं एका देवळांत सोन्याची सुंदर नारायण मूर्ति बसलेल्या मनुष्याएवढी आहे. येथून बदरीनारायण सहा कोसांवर राहतो. नंतर **ब्राम्हणीगांवा**वरून पुढें **कुबेरशिला** व **कुबेरगंगा** लागते.

नांवाचें झाड आहे, तें आंगाला लागलें तर विंचू चावल्याप्रमाणें त्रास होतो. वाटेंत उंच उंच डोंगर असल्यामुळें सूर्याचें ऊन लवकर पडत नाहीं, व धुकें असतें, व कोठें कोठें बर्फही पडतो, व पाऊसही पडतो. तांदूळ, कणीक, उडदांची डाळ ह्याशिवाय कांहीं मिळत नाहीं. डोंगरावरून दगड कोसळून वाटेवर येऊन कधीं कधीं पडतात, व रानमाशा चावतात. वाटेंत एका बाजूनें उंच डोंगर असून दुसरे बाजूला गंगानदी जोरानें वाहात असते तिचा मोठा आवाज ऐकूं येतो. कोठें कोठें झुले उतरून जावें लागतें. यात्रेकरूंना उतरण्याकरितां गवताचीं छपरें आढळतात, त्यास 'चट्टी' म्हणतात. यात्रेकरू पैसेवाला असो अगर गरीब असो, तथापि वाटेचें दुःख दोघांनाही सारखेंच होतें. हरिद्वारापासून निघून त्रिस्थलीची यात्रा करून परत हरिद्वारास येई तोंपर्यंत एक मणाचा बोजा नेणाऱ्या गड्यास मजूरी रुपये ६० पडतात. झंपाणाला रुपये २५० किंवा ३००. कंडीला ६०।८०।१०० पडतात. हा प्रांत वायव्य प्रांताखालीं मोडत असून नैनीतालच्या कमिशनरच्या ताब्यांत आहे, ह्यांपैकीं गंगोत्रीचा भाग टेरी संस्थानचा मुलूख आहे, व केदार व बदरीनारायण हे ब्रिटिश सरकारचे मुलुखांपैकीं आहेत.

बदरीनारायण व श्रीनगर येथें कस्तुरी, शिलाजीत, निर्विषी ( सापावर व विंचवावर औषध आहे असें ह्मणतात ), मोहरजहरा ( म्हणजे बर्फापासून दगड बनलेला असून तो उष्णता व कडकी ह्याजवर औषध म्हणून उगाळून देतात ). साधारण बर्फापेक्षां तिकडील बर्फ रेतीसारखा भुसभुशीत असून त्याचें पाणी इतकें थंड असतें कीं, ह्याच्यापेक्षां त्यांत हाताला फार झिणझिण्या येतात. नद्यांमध्यें वरील पाणी गोठून बर्फ झालेलें असतें व त्याचे खालीं पाण्याचा प्रवाह असतो. त्रिस्थलीची यात्रा करणारांकडून त्यांचें नांव वगैरे पंडे (म्हणजे उपाध्ये) आपल्या वह्यांत लिहून घेतात.

## द्वारका.

द्वारका हा गांव गुजराथ द्वीपकल्पाच्या पश्चिम टोकाजवळ उत्तर अक्षांश २२ं १५ व पूर्व रेखांश ६९ं ७ येथें आहे. द्वारकेस जाणारे लोक शिदपुराहून किंवा मुंबईहून जातात.

शिदपुराहून जाणारे आगगाडींतून जातात. सन १८९० सालीं आगगाडीपासून द्वारका तीस कोसांवर होती एवढें अंतर बैलगाडीनें जावें लागतें.

मुंबईहून जाणारे लोक आगबोटींत बसून जातात, तीन दिवसांचा रस्ता आहे. वाटेंत वेरावळ म्हणून एक बंदर लागतें, तेथें सोरटीसोमनाथाचें देऊळ आहे. पुढें सुदामपुरी म्हणून बंदर लागतें, तेथें लोक उतरून तीर्थविधि करितात. येथें सुदामाचें देऊळ आहे, त्यांत सुदामाची दगडाची मूर्ति आहे, व केदारेश्वर म्हणून महादेवाचें देऊळ आहे. पुढें द्वारका बंदराला धक्का बांधलेला नसल्यामुळें पडावांत बसून द्वारकेपर्यंत सुमारें दोन मैल जावें लागतें.

द्वारकेस **द्वारकानाथाचें** फार मोठें देऊळ आहे. त्यांत काळ्या दगडाची द्विभुज मूर्ति द्वारकानाथाची आहे. असें म्हणतात कीं, तेथील पुजाऱ्यांनीं सुमारें ६०० वर्षांपूर्वीं देवाची मूर्ति तेथून काढून डाकुरास नेली, नंतर ब्राम्हणांनीं मोठ्या प्रयत्नानें तिच्या जागीं दुसरी मूर्ति बसविली, आणि ही ही मूर्ति जवळ **शंखद्वार** बेट आहे तेथें सुमारें १५० वर्षांपूर्वीं नेली. नंतर द्वारकेस आणखी नवीन मूर्ति स्थापन केली. तेथें **गोमती** नदी आहे. यात्रेकरू तींत स्नान करितात. त्याजबद्दल दरमाणशीं साडेचार रुपये बडोदे सरकारास कर द्यावा लागतो. नंतर देवदर्शन करून आपले शक्तीप्रमाणें देवापुढें काय ठेवणें असेल तें ठेवितात. ह्या क्षेत्रीं तीर्थविधि करितात. भाषा गुजराथी आहे. गुजराथी कापड तऱ्हेतऱ्हेचें मिळतें. येथें सुमारें पांचसहाशें घरांची वस्ती आहे. येथें **आरमरा** ठिकाणीं जाऊन कांहीं लोक ब्राम्हणाकडून तप्तमुद्रा घेतात. खर्च दीड

रुपया पडतो. मुद्रेचा आकार आंगठीसारखा वाटोळा असून आंत कमळासारखें असतें.

द्वारकेपासून दहा कोसांवर एक **बेट** आहे, तेथें होडींत बसून किंवा पायरस्त्यानें लोक जातात. येथील देवाचे दर्शनाबाबद पांच रुपये कर द्यावा लागतो. येथें अष्टनायकांचीं निरनिराळीं देवळें आहेत. द्वारका व बेट ह्या दोन्ही ठिकाणीं मनुष्याप्रमाणें देवाकडून पुजारी लोक सर्व विलास करवितात. ती मौज मोठी पहाण्यासारखी आहे. द्वारकेस दिपवाळींत पहाण्यासारखा उत्सव होतो, त्या वेळीं अनेक प्रकारचीं पुष्कळ पक्वान्नें करून त्यांचे मोठमोठाले ढीग देवापुढें करितात, त्यास **अन्नकोट** असें म्हणतात. येथून थोडया अंतरावर **गोपीतलाव** आहे. तेथें कृष्णाच्या सर्व गोपी गुप्त झाल्या असें म्हणतात. ह्या तलावांतील गाळालाच गोपीचंदन असें म्हणतात. समुद्र किनाऱ्यावर ओहोटीचे वेळीं चक्रांकित, पद्में, कवड्या, वगैरे अनेक प्रकारचीं किड्यांचीं घरें सांपडतात.

## पुष्कर.

मथुरेहून आगगाडींत **अजमिरास** जाण्याला सुमारें तेरा तास लागतात. अजमिराहून एक्यांत बसून तीन कोस **पुष्करास** जावें लागतें. पुष्करांत एक मोठा तलाव असून त्यांतील पाणी फार स्वच्छ व गोड आहे. ह्या तीर्थावर गोदावरीप्रमाणें तीर्थविधि करावा लागतो. येथें ब्रम्हदेवाचें एक मंदिर आहे, तेथें **ब्रम्हदेवाचें** दर्शन घेऊन नंतर वराहाचे देवालयांत **वराहाचें** दर्शन घेऊन दीड कोसावर **ब्रम्हपुष्कर** म्हणून एक तलाव आहे, तेथें स्नानास जावें व टेंकडीवर **ब्रम्हदेव** आहे त्याचें दर्शन घ्यावें. ह्या ठिकाणीं मोर पुष्कळ आहेत.

## सिदपूर.

अजमिराहून **सिदपूर** आगगाडीनें सुमारें बारा तासांचा रस्ता आहे. सिदपुरास **सरस्वति** नदी आहे. तेथें गोदावरीप्रमाणें सर्व विधि करून

दुसरे दिवशीं सुमारें एक कोसावर **बिंदुसरोवर** आहे, तेथें जावें. ह्या सरोवरावर स्नान करून व आणखी दोन सरोवरें आहेत त्यांत स्नान करून आईचें श्राद्ध करावें. ह्या श्राद्धांत पिंड तीन असून सोळा धर्मपिंड करावे लागतात. उपाध्या बरेंच द्रव्य मागतो. ह्या श्राद्धास **मातृगया** असें म्हणतात. सिद्धपुराहून निघाल्यावर बडोद्याजवळ **गोमती** नदीच्या तीरीं **डाकूर** गांवांत **द्वारकानाथाचें** देऊळ आहे तेथें कोणीं कोणीं जातात. ह्याच्या दक्षिणेस भडोच्यास **नर्मदा**नदी आहे, तेथें कोणी येतांना स्नान करण्यास उतरतात. कित्येक लोक मुंबईस येऊन कल्याणावरून पुनः **नाशिकास** गंगेची व गोदेची भेट करण्याकरितां जातात. ही भेट केल्यावर आपले गांवीं जाऊन घरीं न जातां दुसरे ठिकाणीं उतरतात. मग गंगेस पालखींत ठेवून वाजतगाजत आपले घरीं समारंभानें नेतात. घरीं आल्यावर घृतश्राद्धाप्रमाणें दधिश्राद्ध करावें लागतें. नंतर काळभैरवाप्रीत्यर्थ आठ ब्राह्मण घालावे लागतात. ह्या पुढें एके दिवशीं गंगेची महापूजा व ब्राह्मणभोजन करितात. ह्यास **मांडंदे** असें म्हणतात.

ह्याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांत यात्रा करून मग दक्षिण हिंदुस्थानांत जी यात्रा करितात ती येणेंप्रमाणें:—

## कार्तिकस्वामी.

पुण्याहून आगगाडीचे रस्त्यानें सोलापुराकडे चाललें असतां सोलापुरापलीकडे **कलबुर्गें** शहर लागतें. त्याचेपुढें **शहाबाद** शहर आहे. तेथील पांढरे दगड आणून सर्व स्टेशनावर इमारतीस लाविले आहेत. तेथून आगगाडींतून **रायचुराला** जातांना मध्यें **कृष्णा**नदी लागते, तेथें तीर्थविधि करावा. ह्या ठिकाणीं कृष्णेला मोठा लोखंडी पूल छत्तीस कमानींचा व ३८९४ फूट लांबीचा आहे. रायचूर येथें जी. आय. पी. रेल्वे संपते. तेथून मद्रास रेल्वेची आगगाडी आहे. ह्या गाडींतून **गुंदकल्ल** स्टेशनपर्यंत जावें. तेथें आगगाडीचे तीन फांटे फुटतात. एक मद्रासेकडे जातो, दुसरा ईशान्येकडे जातो, व तिसरा पश्चिमेस **बल्लारीकडे** जातो. बल्लारीकडे जाणाऱ्या आगगाडींतून बल्लारीस जावें. बल्लारी हें मोठें शहर असून तेथें

एक किल्ला आहे. तेथून कार्तिकस्वामींचा डोंगर पंधरा कोस आहे. तिकडे बैलगाडी किंवा घोडें करून जावें लागतें. वाटेंत घोरपडे यांचें **सोंडूर** म्हणून गांव लागतें. तेथून कार्तिकस्वामी तीन कोस आहे. तेथें जाण्याला सोंडुरापासून पुढें डोंगर चढावा लागतो. ह्या डोंगराचें नांव **लोहाचल** असें आहे. वाटेंत एक शिवस्थान असून तेथें **शिवतीर्थ** आहे. कार्तिकस्वामीची मूर्ति काळ्या दगडाची असून चांगली केलेली आहे. मध्यें स्वामीचें देऊळ असून उजवेकडे शिवाचें देऊळ आहे, व डावीकडे पार्वतीचें देऊळ आहे. कार्तिकीपौर्णिमेस कृत्तिका नक्षत्र असेल तेव्हां कार्तिकस्वामीचे दर्शनाचें मोठें माहात्म्य आहे, आणखी त्याच दिवशीं शिवयोगाचा योग असल्यास जास्त फळ सांगितलें आहे. डोंगरावर कार्तिकस्वामींनीं ज्या ठिकाणीं आईचें दूध ओकून टाकिलें त्या ठिकाणीं पांढरी माती आहे. तिचे खडे यात्रेकरू भक्तीनें घेऊन येतात, व तिकडील स्मार्त ब्राम्हण तिचा भस्माप्रमाणें उपयोग करितात. येथें **अगस्तीतीर्थ** असून जवळ **अगस्तीश्वर** व **लोपामुद्रेश्वर** अशीं महादेवाचीं दोन लिंगें आहेत. येथें दर्शनाशिवाय दुसरा कांहीं विधि करावा लागत नाहीं. यात्रा भरते तेव्हां स्वामीचे दर्शनास यात्रेकऱ्यांना सोंडूरकर घोरपडे यांचे अधिकाऱ्यास कर द्यावा लागतो.

## हंपीविरूपाक्ष.

हा गांव **तुंगभद्रेचे** कांठीं आहे. कार्तिकस्वामीहून परत सोंडुरास आल्यावर बैलगाडींतून **हंपीस** जातात. रस्ता बारा तासांचा आहे. भाडें दरमाणशीं सुमारें आठ आणे पडतात. येथें **विरूपाक्ष** नांवाचें महादेवाचें देऊळ मोठें असून महाद्वारावर सुंदर व उंच गोपूर आहे. देवळासभोंवतीं ओऱ्या आहेत. देवाचा एक मोठा रथ असून तो चैत्र शुद्ध पौर्णिमेस उत्साहाचे अंतीं बाहेर काढितात. पुजारी तैलंग ब्राम्हण आहेत. तेथें पालांचे मंडप घातलेले असतात, ते राहण्यास भाड्यानें मिळतात. **अगस्तीतीर्थ** म्हणून एक तळें असून त्यांत एक कुंड आहे.

थोड्या अंतरावर **क्षत्रपालवीरभद्राचें** स्थान असून तेथील मूर्ति दीड पुरुष उंचीची आहे. तेथून जवळच एक नृसिंहाचें स्थान असून मूर्ति अतिशय फार मोठी आहे. सुमारें एक कोसावर **पंपासरोवर** व **मानससरोवर** अशीं दोन तळीं आहेत. येथें पाहण्यासारखीं ठिकाणें आहेत तीं येणेंप्रमाणें:—**मातंगऋषीचा पर्वत, अंजनी पर्वत, सीता सरोवर, ऋष्यमूक पर्वत, किष्किंधा पर्वत,** ह्यासच **अनीगोंदी** म्हणतात. येथें राजवाडा मध्यम प्रतीचा आहे. वाळीचें हाड, त्याला रामानें मारल्याची जागा, सातताड वृक्षांची जागा व रामाचे पाय दगडांत लागलेले, व वाळीला जाळलेल्या ठिकाणीं मोठा डोंगरासारखा राखेचा ढीग, तारेचा महाल म्हणून एक डोंगर, इतकें तेथें आहेत. चक्रतीर्थ नदीचे कांठीं आहे, एका गुहेंत रंगमूर्ति म्हणून काळी एक हात उंचीची मूर्ति आहे. नदीचे कांठीं रामाचें देऊळ असून त्यांत राम, लक्ष्मण, सीता व मारुती ह्यांच्या मोठ्या मूर्ति आहेत. जवळच **यंत्रोद्धार** मारुती आहे.

महादेवाची भोगमूर्ति पालखींत बसवून दररोज संध्याकाळीं देवळासभोंवतीं फिरवून सभामंडपांत लहान रुप्याच्या कड्यांचा झोंपाळा आहे त्यावर आणून बसवितात. त्याचे समोर कलावंतिणींचा नाच करवून मग शेजआरती करितात. देवळा सभोंवतीं चौसोपी दगडी इमारत आहे. दक्षिणेकडील सोप्यावरून पाटाचें पाणी नेलें आहे. देवळा बाहेर शंकराचार्य मठ विद्यारण्य स्वामीचा असून त्यांचे गादीवर एक स्वामी आहेत. त्यांस व देवाला सरकारी उत्पन्न येतें.

## गोकर्णमहाबळेश्वर.

**हुबळी** स्टेशनावर उतरून तेथून बैलगाडीनें पांचवे दिवशीं **गोकर्ण** ( उ० अ० सुमारें १४ँ व पू० रे० ७४ँ ) येथें पोंचतात. ह्या ठिकाणीं मलबारी लोकांची वस्ती आहे. कोंकणस्थ ब्राम्हणाचें एकच घर आहे. बाजारांत सर्व प्रकारचे जिन्नस मिळतात. नारळ फार स्वस्थ आहेत. समुद्रकिनाऱ्यानजीक महादेवाचें देऊळ द्रविड चालीचें बांध-

लेलें असून पुढें सभामंडप आहे. देवाचा गाभारा सुमारें ३० फूट चौरसचौरस असून ६० फूट उंच आहे. शिखरावर आठ दिशांस अष्ट लोकपालांच्या मूर्ति असून विष्णूच्या दहा अवताराच्या मूर्ति आहेत. देवाचें लिंग जमिनीपासून सुमारें तीन बोटें वर दिसतें. मंडपांत पार्वती व गणपति ह्यांच्या मूर्ति असून मध्यभागीं नंदी आहे. येथें यात्रेकरूलोकांचे नंदादीप सुमारें शंभरांवर आहेत. दररोज साठ शेर भाताचा नैवेद्य होतो, तो देवळांतील नोकर लोक खातात. रोज पंचामृताची पूजा होते व बेल वहातात. यात्रेकरूला देवाची पंचामृतपूजा करणें असल्यास पुजाऱ्यास आठ आणे व देवापुढें चार आणे ठेवावे लागतात. व एकादशरुद्र करणें तर पुजाऱ्यास व देवास मिळून एक रुपया द्यावा लागतो. लघुरुद्र केला तर पांच रुपये द्यावे लागतात. महारुद्र केला तर साठ रुपये द्यावे लागतात. अतिरुद्र केला तर दीडशें रुपये द्यावे लागतात. माघ वद्य १० पासून फाल्गुन शुद्ध २ पावेतों मोठी यात्रा भरते. जत्रेमध्यें गुरें, तांब्यापितळेचीं भांडीं, कापड, जवाहीर व धान्य ह्यांची विक्री पुष्कळ होते. शिवरात्रीस महादेवाचा मोठा उत्सव होतो, रात्रीं दारू पुष्कळ उडवितात. गांवाजवळ एक तळें आहे, त्यांत शिवरात्रीचे दुसरे दिवशीं देवाला स्नानास नेण्याचा उत्सव होतो. ह्या देवळाशिवाय दुसरीं २० देवळें, ३० लिंगें आणि ३० तीर्थें आहेत. नजीकच **शाकेश्वर** असून त्याचे खालीं **आदिगोकर्ण** आहे. ह्या देवाचे लिंगासभोंवतीं खणून त्यांत मोतीं व रत्नें ह्यांचा चुरा घालून बंद करितात, त्यास **अष्टबंध** म्हणतात. जवळ डोंगरावर **वृद्धगोकर्ण** म्हणून महादेवाचें देऊळ आहे. शिवरात्रीचे दिवशीं लोक उपास करून **कोटितीर्थांवर** आणि **ताम्रपर्णी** नदी समुद्रास जेथें मिळते तेथें स्नान करून ब्राम्हणाला दक्षिणा देऊन गणपतीची पूजा करून मग महाबळेश्वराची पूजा करितात. येथें फाल्गुन शुद्ध १ रोजीं रथांत मूर्ति बसवून मोठा उत्सव होतो. कोटितीर्थांत **सप्तकोटीश्वर** म्हणून महादेव आहे व एक नंदी आहे. ह्या तीर्थाचे पश्चिम किनाऱ्याला **काळभैरवाचें** देऊळ

आहे, दुसरे देवांचीं लहान लहान देवळें आसपास आहेत. गोकर्णम-हाबळेश्वराचे देवळासमोर ज्ञान, वैराग्य आणि मुक्ति असे तीन मंडप आहेत.

जे आगबोटींतून जातात ते कुमठयाच्या बंदरावर उतरतात. तेथून गोकर्णमहाबळेश्वर पांच कोस आहे.

## श्रीशैल्य मल्लिकार्जुन.

गुंदकल स्टेशनाहून मद्रास रेल्वेनें दक्षिणेकडे जातांना गुत्ती स्टेशन लागतें. तेथें उतरून बैलगाडी करून लोक श्रीशैल्याकडे जातात. तेथून रस्ता सात दिवसांचा आहे. पेचूर पावेतों बैलगाडी जाते, तेथून भाड्याचें घोडें करून श्रीशैल्यावर चढून जातात. वाटेंत खडबडीत पाहेऱ्या आहेत. डोंगरावर मल्लिकार्जुन ह्या नांवाच्या महादेवाचें साधारण देऊळ आहे. नंदी फार मोठा आहे. महादेवाचा पुजारी जंगम आहे, व पार्वतीचें देऊळ निराळें असून पुजारी तैलंग ब्राह्मण आहे. येथील देवाचें दर्शनास शंकराचार्यांचा कर दरमाणशीं एक रुपया दोन आणे पडतो. देवाला अभिषेक करण्याचा असल्यास दहापंधरा रुपये पडतात. शिवरात्रीस मोठा उत्सव होतो. सुमोरें एक लक्ष यात्रा जमते. शिताफळीचीं झाडें फार आहेत, फळें खाल्लीं तर हींवताप लागतो. पुजारी नेहमीं खाटेवर आजारी पडलेले असतात. डोंगराचे दुसऱ्या बाजूनें गुळगुळीत पाहेऱ्या आहेत. त्या सुमारें दोन कोस उतरून गेल्यावर कृष्णा नदी लागते. तिला तेथें पाताळगंगा असें म्हणतात. येथें तीर्थविधि करावा लागतो. यात्रेकरू कृष्णेचें पाणी नेऊन देवावर घालितात. डोंगरावर पाण्याचीं टाकीं आहेत. तें पाणी गार व वाईट आहे. तें प्यालें तर हींवताप लागतो. डोंगरावर चित्रकाचीं झाडें फार असून त्यांच्या मुळ्यांनीं पाणी बिघडलेलें असतें. ओढ्याचें पाणी पिण्याला बरें आहे. शिखरदर्शनाकरितां तीन कोस जाऊन तेथें एक शिखरेश्वर महादेवाचें देऊळ आहे, त्यावर दिपमाळेसारखें उंच बांधलेलें आहे, त्यावर चढून त्याचे शेंड्यावर एक

दगडाचे पेल्याप्रमाणें भांडें असून एक वरवंटा आहे. त्या भांड्यांत तांदूळ व पाणी घालून त्या वरवंट्यानें घोटून तें अंगाला चोळून मग यात्रेकरू शिखराचें दर्शन करितात, त्या वेळीं असा श्लोक म्हणतात कीं, काश्यां-तु मरणान्मुक्तिः स्मरणादरुणाचलं ॥ श्रीशैल्य शिखरं दृष्ट्वा पुनर्जन्म न विद्यते ॥ यात्रेच्या वेळेशिवाय इतर वेळीं तेथें खाण्यापिण्याचे जिन्नस कांहींच मिळत नसल्यामुळें यात्रेकरूंना ते पेचुराहून किंवा आत्मकुराहून न्यावे लागतात. येथें पहाण्यासारखे **पंचमठ** म्हणून दगडी ओंन्या आहेत. तेथें पूर्वी ऋषि रहात होते असें म्हणतात. हल्लीं तेथें वाघ अस्वलें असतात व जंगल फार आहे, सबब भिल्लांची मदत घेऊन पहाण्यास जातात. येथें रखवालीबद्दल भिल्लांना दरमाणशीं दररोज एक आण्याप्रमाणें द्यावें लागतें. रामेश्वराहून परत येतांना जे लोक श्रीशै-ल्यास जातात ते **कडाप्पा** स्टेशनावर उतरून तेथून तुंगभद्रेच्या काल-व्यांतून नावेंत बसून पांच दिवस जाऊन **वेलपल्लुरास** उतरतात. तेथून बैलगाडीनें पेचुरास येण्यास तीन दिवस लागतात.

## त्रिपति म्हणजे व्यंकोबाची गिरी.

बल्लारीहून **गुंदकल्लु** येथें येऊन तेथून मद्रास रेल्वेच्या आगगाडींत बसून **त्रिपति** स्टेशनापर्यंत जावें. तेथून व्यंकोबाची गिरी सुमारें तीन कोस आहे. तिकडे जातांना **गोविंदराजपट्टण** लागतें. तेथून एक कोसावर **कपिलतीर्थ** आहे. तें असें कीं, डोंगरावरून पाण्याची मोठी धार पडते, पाण्याला एक कुंड बांधिलें असून त्यांत उतरण्यास पाहेऱ्या केल्या आ-हेत. येथें तीर्थविधि करावा लागतो. जवळच **वेणूगोपाळ** व **लक्ष्मीना-रायण** व **कपिलेश्वर** अशीं देवस्थानें आहेत. येथून डोंगराचा मोठा च-ढाव लागतो. वर जाण्यास अशक्त मनुष्यास डोलीही मिळते. डोंगराचें नांव **शेषाचल** आहे. डोंगर चढतांना वाटेंत कांहीं ठिकाणीं पाहेऱ्या लाग-तात व कांहीं ठिकाणीं दरवाजे असून त्यांचेवर गोपुरें आहेत. त्यांपैकीं एका गोपुरास **चाळीगोपूर** असें म्हणतात. येथें वारा चांगला लागत

असल्यामुळें तेथें यात्रेकरू विसावा घेतात. कांहीं देवस्थानें लागतात. डोंगर सुमारें पांचसहा कोस चढून गेल्यावर तेथें **स्वामिपुष्करणी** नांवाचें तीर्थ आहे, त्यांत स्नान करून **वराह** देवाचें दर्शन घेऊन मग **व्यंकोबाचें** दर्शन घ्यावें. व्यंकोबाची मूर्ति पुरुषाइतकी मोठी असून उभी आहे. देवाचे पुजारी रामानुज ( म्हणजे त्रिपुंड्री ) आहेत. देवाचे उत्सवाचे प्रकार गरुडवहान इत्यादि अनेक आहेत, त्यांत ब्रम्होत्सव मोठा आहे, तो करण्यास हजार रुपये द्यावे लागतात. त्या उत्सवांत सर्व प्रकारचीं वहनें काढितात. देवाला अनेक प्रकारचे नैवेद्य दाखवितात, त्यांत मनोहराचा नैवेद्य मुख्य आहे. येथें सोवळ्याओंवळ्याचा विचार मुळींच नसून त्याजबद्दल कोणी मनांत शंका आणूं नये.

येथें आश्विनमासीं नवरात्रींत मोठा उत्सव होतो. दररोज निरनिराळें वहन काढून दसऱ्याचे दिवशीं व्यंकोबाची लहान उत्सवमूर्ति **त्यांत** बसवून **रथ** देवळासभोंवतीं फिरवितात. देऊळ तांब्याचे पत्र्यानें मढविलेलें असून पत्र्यावर सोन्याचें पाणी चढविलेलें आहे, परंतु फार दिवस झाल्यानें सोनें उडून गेल्याचें दिसतें. नवरात्रींत येथें मोठा बाजार भरून अनेक प्रकारचीं भांडीं बाहुल्या वगैरे सामान विकण्यास ठेवितात. देवासाठीं अन्न तयार केलेलें असतें तें यात्रेकरू विकत घेऊन ओंवळ्यानें खातात. असें करण्यास तेथें दोष नाहीं. येथें पूर्वी **हत्तीरामबुवा** म्हणून एक साधु होता, त्याचा मोठा मठ आहे. त्याचे गादीवर हल्लीं त्याच्या परंपरेनें आलेला शिष्य आहे. देवाचें उत्पन्न व खर्च हीं मोठीं असून त्याची व्यवस्था त्या शिष्याकडे आहे, ह्यास्तव त्याच्या हाताखालीं एक स्वतंत्र मामलेदार असून, कारकून, शिपाई वगैरे आहेत. यात्रेकऱ्यांनीं देवाची पूजा करविण्याचे प्रकार अनेक आहेत, व त्याजबद्दल निरनिराळ्या रकमाही ठरविलेल्या आहेत. उदाहरणार्थ, शुक्रवारीं व्यंकोबाला **पुनकाभिषेक** होत असतांना दर्शन घेणारानें एक रुपया द्यावा; तुळशी अर्चनाचे वेळीं दर्शन घेणारानें बारा रुपये

द्यावे; देवाला कापराची मंगळआरती करविणें झाल्यास एक रुपया द्यावा; इ०. कोणा मनुष्याचे नांवानें कापराची मंगळआरती रोज करविणें असल्यास वर्षाचे एकवीस रुपये पडतात, लोणी खडीसाखरेचा नैवेद्य रोज दाखविणें असल्यास वर्षाचे बेचाळीस रुपये द्यावे लागतात, इ०.

नवस देण्याची रीति अशी आहे कीं, देवाच्या पुढील मंडपांत **कोप्पश्गी** म्हणून एक हंडा ठेवून त्याजवर पांढऱ्या पिशवीचें आच्छादन सुमारें छातीभर उंचीचें असतें त्यांत नवस वगैरे देवास द्यावयाचा जिन्नस टाकितात. देवाचे पुढें मंडपांत एक मोठी घंटा आहे, ती सकाळीं देवाचें दार उघडितांना, दोन प्रहरीं बारा वाजतांना, पुजेच्या वेळीं, आणि संध्याकाळीं तास रात्रीचे सुमारास, वाजवितात. तेथें यात्रेकरूंची गर्दी होऊन त्यांना त्रास न व्हावा म्हणून तेथील नोकर कृष्णाजिनाच्या वळकट्या हातांत घेऊन चाबकाप्रमाणें उपयोग करितात. देवळांत जाण्यास दरवाजे तीन आहेत. देवळाचे गोपुराचे मध्यभागीं **श्रीनिवासाची** मूर्ति आहे. व्यंकोबाचें दर्शन घेण्यास दार बंद असल्यास ह्या मूर्तीचें दर्शन घेतात. देवळाचे आवारांत **उग्राण** (म्हणजे नैवेद्य तयार करण्याची जागा) आहे. देवाचे आवारांत एक विहीर आहे, तिचें पाणी देवाचे पूजेस व अभिषेकाला घेतात. प्रदक्षिणेचे वाटेवर **तोटलतीर्थ** नांवाचें एक कुंड आहे, त्यांत देवाचे अभिषेकाचें पाणी येऊन सांठतें, तें हरएक यात्रेकरू हात बुचकळून घेऊन पितात. यात्रेकरू तेथून निघतांना श्रीपादरेणू, तीर्थ, मनोहराचा लाडू, आणि वडे हे जिन्नस पुजाऱ्यापासून विकत घेऊन आणितात.

**पापनाशनि, आकाशगंगा, पांडवतीर्थ, तुंबरतीर्थ,** इ० तीर्थें आहेत. तेथें माकडांचा उपद्रव फार आहे, हें ठिकाण पवित्र असल्यामुळें परदेशचे लोक बहुतकरून वर जात नाहींत. येथें नळ आणून पाण्याचा पुरवठा चांगला केला आहे. यात्रेकरूंना उतरण्याला अन्नछत्रें

पुष्कळ आहेत. त्यांत पूर्णय्याचें छत्र जुनें असून मोठें आहे. बहुतेक अन्नछत्रीं जेवण्याची व रहाण्याची सोय होते. त्याशिवाय भाड्यानेंही जागा मिळते. येथें ब्राम्हणभोजनास लागणारे सर्व जिन्नस मिळतात. येथें कायम रहाणारे ब्राम्हणांचीं घरें दहाबारा आहेत. येथें अधिकमास धरीत नाहींत, व लग्नें पाहिजे त्या महिन्यांत करितात.

गिरीची यात्रा करून लोक डोंगर उतरून **गोविंदराजपट्टणास** येऊन छत्रांत उतरतात. येथें **गोविंदराजाचें** देऊळ असून आंत **शेषशाईची** मोठी मूर्ति पहाण्यासारखी आहे.

## सुब्रह्मण्य.

सुब्रम्हण्याचे यात्रेकरितां लोक आगगाडीनें **त्रिचनीस** जातात. हा गांव लहान असून येथें उतरण्यास सोई चांगल्या आहेत. डोंगरावर पायऱ्या चढून गेल्यावर **कल्हार सरोवर** आहे. त्याचें आचमन करून मैदानांत देऊळ आहे त्यांत **सुब्रम्हण्याची** सुंदर मूर्ति आहे, तिचें दर्शन घेतात. भोंवतालीं कार्तिकस्वामीचे संबंधाच्या इतर मूर्ति आहेत. येथें दर महिन्यास कृत्तिका नक्षत्र असल्यादिवशीं पुष्कळ लोक देवदर्शन घेतात. येथें कार्तिकस्वामीचें दर्शन बायकाही घेतात.

## कांची.

कांचीची यात्रा करण्यासाठीं लोक त्रिचनीहून आगगाडीनें **अर्कोनं** स्टेशनापर्यंत जाऊन तेथें उतरतात. तेथून **कांचीस** जातात. कांचीच्या प्रदेशास **कांचीमंडळ** असें म्हणतात. झाडांच्या संबंधानें येथील देखावा कोंकण प्रदेशाप्रमाणें दिसतो. ह्या क्षेत्राचे **शिवकांची व विष्णुकांची** असे दोन भाग आहेत. त्या दोहोंमध्यें दोन कोसांचें अंतर असून दोहों बाजूनीं सारखी वस्ती असून बाजार आहे. त्या दोहोंच्या हद्दीवर एक मोठा रथ आहे.

**शिवकांची** येथें **सर्वतीर्थ** म्हणून एक मोठें बांधीव तळें आहे. येथें यात्रेकरू तीर्थविधि करितात. मुख्य देव **एकांबरेश्वर** आहे. ह्याचें

देऊळ फार मोठें असून सभोंवतीं आवार सुमारें पांच सहा मैलांचा आहे. त्यांत पुष्कळ देवता व तीर्थें आहेत. त्या सर्वांचीं दर्शनें घेण्यास सुमारें दोन तीन मैल चालावें लागतें. कांहीं नियमित रक्कम दिली असतां तेथील पुजारी ब्राम्हण देवाची महापूजा करितात. येथें देवाचा रथ फार अपूर्व आहे. त्याचा नऊ दिवस उत्साह होतो. महादरवाजावर पहाण्यासारखें मोठें गोपूर आहे. थोडया अंतरावर **कामाक्षी** देवीचें देऊळ असून आंत देवीची मूर्ति फार सुंदर आहे. ब्राम्हण स्मार्त असून त्यांत पुष्कळ विद्वानही आहेत.

**विष्णुकांची** विष्णुकांचींत **हस्तिगिरी** म्हणून एक टेंकडी आहे. तिजवर पाहेऱ्या चढून गेल्यावर तेथें **वरदराजाचें** देऊळ आहे. देवाचा नैवेद्य व पूजा कांहीं नियमित रकम यात्रेकऱ्याकडून घेऊन तेथील रामानुज पुजारी करितात. देवाचे मंडपांतील छतास एक सोन्याची मोठी पाल बसविली आहे. कोणाच्या अंगावर पाल पडून तो ह्या पालीस शिवला असतां त्यास वाईट होत नाहीं असें म्हणतात. येथें **वेगवति** नदी आहे. रामानुज ब्राम्हण असून कांहीं चांगले विद्वान नैय्यायिक आहेत. ह्या दोन्ही क्षेत्रीं रथाचा उत्सव पहाण्यासारखा आहे.

येथून यात्रेकरू **अर्कोनं** स्टेशनावर परत येतात. ज्यांना मद्रास शहर पहाणें असेल ते मद्रासेस जातात, व ज्यांना रामेश्वराची यात्रा करणें असेल ते आगगाडीनें **त्रिचनापल्ली**कडे जातात.

## श्रीरंग.

**त्रिचनापल्ली** हें **कावेरी** नदीचे दक्षिणकांठीं मोठें शहर आहे. येथें कावेरीचे दक्षिणकावेरी व उत्तरकावेरी असे दोन भाग होऊन मध्यें एक बेट झालें आहे, त्यांत **श्रीरंगाचें** मोठें देऊळ आहे. येथें असा एक चमत्कार दृष्टीस पडतो कीं, दररोज सकाळीं देवपूजेच्या वेळीं एक हत्ती व एक गाय येऊन देवापुढें उभे रहातात, व पूजा संपल्यावर हीं दोन्हीं जनावरें मोठ्यानें ओरडून जमिनीवर डोकें ठेवून निघून जा-

तात. येथें तीर्थविधि करितात. एका टेकडीवर **मातृभूतेश्वराचें** मोठें देऊळ आहे. टेकडी चढतांना मध्यें **प्रसन्नविनायक** नांवाचा गणपति आहे, व **जंबुकेश्वर** नांवाचा महादेव आहे.

## रामेश्वर.

त्रिचनापल्लीहून आगगाडीनें यात्रेकरू **मधुरा** स्टेशनावर जातात. येथून रामेश्वर सुमारें ऐशीं मैल असून पायरस्ता आहे. ज्याला रामेश्वर येथें ब्राम्हणभोजन वगैरे करावयाचें असतें तो येथून सर्व जिनसा घेऊन जातो. येथें **सुंदरेश्वर** व **मीनाक्षीदेवी** अशीं दोन पहाण्यासारखीं देवळें आहेत. मधुरेपासून तीन मुक्काम करून समुद्राचे कांठीं **नवपाषाण** म्हणून एक जागा आहे, तेथें यात्रेकरू जातात. तेथें **रामाचें** एक देऊळ आहे, व **चक्रतीर्थाचें** कुंड आहे. येथें तीर्थविधि करितात. ह्यास नवपाषाण म्हणण्याचें कारण तेथें नऊ ग्रहांचे नऊ दगड आहेत. येथून रामेश्वरास जाण्याला नावेंत बसून जावें लागतें. वाटेंत सुमारें तीस पसतीस मैल गेल्यावर **पाबेन** बेटाचा किनारा लागतो. पुढें **रामेश्वर** सुमारें सहा सात मैल रहातो. हा पुढील रस्ता वाळवंटींतून आहे. रामेश्वरास यात्रेकरू छत्रांत किंवा देवळांत रहातात. रामेश्वराचे देवळा जवळ पार्वतीचें देऊळ असून तेथें पुष्कळ किरकोळ देव आहेत. देवाचे पुजारी जंगम असून प्रत्येक दिवशीं सहा वेळां पूजा करितात. पूजेच्या वेळीं भागीरथीची कावड दररोज येते. सोमवारीं रामेश्वराची पालखी व शुक्रवारीं पार्वतीची पालखी काढितात. यात्रेकरू काशीहून आणिलेली भागीरथी पुजाऱ्याकडून रामेश्वरावर घालवितात. त्याजबद्दल कांहीं द्यावें लागतें. शिवरात्रीस मोठी यात्रा भरते. गांवा बाहेर **लक्ष्मणतीर्थ** आहे. तेथें तीर्थविधि करितात. येथें पुष्कळ तीर्थें आहेत, त्यांत **ब्रम्हारण्य** नांवाचें तीर्थ मोठें आहे. थोड्या अंतरावर **धनुष्यकोटी** म्हणून तीर्थ आहे. तेथें सेतुस्नान करून वाळू घेतात. पुढें यात्रेकरू पाबेन येथें परत येऊन तेथून नावेंत बसून **मेतलीमंडपास** जातात, त्यावेळीं

त्यांना दगडाचा एक बांध दिसतो. त्यालाच **सेतु** म्हणतात. मेतली-मंडपाहून निघून दुसरे दिवशीं **दर्भशयन** येथें जातात. येथें रामचंद्राची मूर्ति व शेषशाईची मूर्ति आहे. गांवाचें नांव दर्भशयन पडण्याचें कारण असें सांगतात कीं, येथें पूर्वी रामचंद्रानीं चिंताग्रस्त होऊन दर्भावर शयन केलें होतें. येथें **चक्रतीर्थ** आहे, तेथें तीर्थविधि करितात. येथून निघाल्यावर यात्रेकरू चवथे दिवशीं परत **मधुरेस** येतात. मधुरेहून परत येतांना लोक वाटेंत दुसऱ्या पुष्कळ यात्रा करितात. त्यामध्यें **चांगल-पेठ** स्टेशनावर उतरून दहा मैलांवर **पक्षितीर्थ** आहे तेथें **भक्तवत्सलेश्वराचें** मोठें पहाण्यासारखें देऊळ आहे. त्या देवास लोक अखंड बिल्व वहातात. ह्या देवळावर दर वर्षीं एकदां वीज पडते, ही गोष्ट देवळांतील नीट ठेवलेलीं भांडीं अस्ताव्यस्त झाल्यावरून समजतें. रात्रीस येथें कोणी रहात नाहींत. जवळच **शंखतीर्थ** आहे, त्यांत दर बारा वर्षांनीं कांहीं ध्वनि प्रथम निघून पुढें थोड्या दिवसांनीं एक शंख पाण्यावर दिसतो. असे निघालेले शंख नीट ठेविलेले असून पहाणारास दाखवितात. तिकडे नजीक डोंगरावर **वेदगिरीश्वराचें** देऊळ आहे. त्या ठिकाणीं डोंगरामध्यें **पक्षितीर्थ** आहे. तेथें पहाण्यासारखा चमत्कार आहे तो असा कीं, दररोज सकाळीं सुमारें अकरा वाजतां दोन मोठे पांढरे पक्षी वेदगिरीश्वराचे देवळावर येऊन बसतात. नंतर तेथील पुजाऱ्यानें साखर-भात व लोणकडें तूप आणलेलें असतें तें पुढें ठेवून बसतो, आणि कांहीं मंत्र म्हणून पक्ष्यांना नमस्कार घालतो. मग ते पक्षी त्याजपाशीं आले म्हणजे त्यांना भात खाऊं घालून तुपाची वाटी पुढें ठेवितो. तें खाऊन पक्षी उडून जातात. हे दोन पक्षी कलियुगाचे शेवटीं उद्धरणार आहेत अशी कथा आहे.

## मंत्रालय.

परत येतांना कोणी कोणी **तुंगभद्रा** स्टेशनावर उतरून पांच कोसांवर **मंत्रालय** म्हणून तुंगभद्रेचे कांठीं एक गांव आहे. तेथें राघ-

वेंद्र स्वामीचें वृंदावन आहे. तेथें स्वामीचें दर्शन घेतात. राघवेंद्र स्वामी हे द्वैत मताचे असून फार विद्वान होते. त्यांनीं आपला मठ निराळा स्थापित केलेला असून त्यांची वंशपरंपरा चालत आलेली आहे.

## पंढरपूर.

तुंगभद्रा स्टेशनाहून परत पुण्याकडे जातांना सोलापुरापलीकडे बारशी रोड स्टेशन आहे, तेथें उतरावें. त्या ठिकाणीं कुरडूची वाडी म्हणून गांव आहे. येथून पंढरपूर बारा कोस आहे. ह्या स्टेशनावर भाड्याचे घोडे, बैलगाडी, तांगे व शिग्राम पंढरपुरास जाण्यास मिळतात. टपालचा तांगा स्वतंत्र केल्यास दोन रुपये पडतात व दोन माणसें बसवितात. बैलगाडी स्वतंत्र केल्यास एक रुपया पडतो, नाहीं तर माणशीं चार आणे व केव्हां केव्हां माणसांच्या भरतीप्रमाणें दोन आणे घेतात. स्टेशनावर उतरण्यास दोन मोठ्या धर्मशाळा आहेत, विहिरीचें पाणी चांगलें आहे. तांदूळ, डाळ, तूप, साखर, सर्पण, वैरण वगैरे नेहमींच्या उपयोगाच्या सर्व जिनसा मिळतात. कित्येक झाडाखालीं उतरून आनंदानें जेवण करितात. यात्रेकऱ्यांना नेण्यासाठीं तेथें पंढरपरचे बडवे आलेले असतात, त्यांची मदत घेतल्यास ते सर्व व्यवस्था ठेवितात, व यजमानाच्या शक्तीप्रमाणें खर्च करवितात. स्टेशनापासून निघालें असतां वाटेनें लऊळ, अष्टी, शेटफळ, खंडाळी, पापरी, बाभळगांव हीं गांवें लागतात. बाभळगांवापासून पंढरपूर चार कोस आहे. पंढरपुरांत बडव्याचे घरीं किंवा धर्मशाळेंत उतरतात. येथें चंद्रभागानदी आहे, तिचें स्नान करून देवदर्शनास जातात. गांवाचे मध्यभागीं मोठें दगडाचें देऊळ आहे, त्यास तीन बाजूंनीं पितळेचें, रुप्याचें, व दगडाचें अशीं दारें आहेत. देवळांत विठोबाची उभी मूर्ति सुमारें दोन हात उंचीची असून पूर्वेस तोंड आहे. देवळावर उंच शिखर असून त्यास सोन्याचा कळस आहे. देवळासमोर दगडी व लांकडी असे दोन मंडप असून सभोंवतीं ओऱ्या आहेत. देवळा

सभोंवतालचे आवारांत लहान लहान देवळें असून त्यांत **रखमाई, राही, सत्यभामा, त्र्यंकोबा, लक्ष्मी** इत्यादिकांच्या मूर्ति आहेत. देवळांत शिरतांना प्रथम **चोखामेळयाचा** धोंडा आहे, पुढें **नामदेवाची** पितळेची पाहेरी आहे, डावे हाताला **तेहेतीस कोटी देव** दोन खणांचे खोलींत मांडून ठेविलेले आहेत, **तांबडा गणपती** असून त्याचे बेंबींत हिरा आहे. मधील गाभाऱ्यांत रूप्यानें मढविलेला **गरुडखांब** आहे, त्यांत **नरसिंहाची** रूप्याची मूर्ति आहे, त्यास भेटून उजवे घालून यात्रेकरू पुढें कासवाच्या आकृतीच्या दगडाची फरशी केली आहे तीस, **रंगशिळा** म्हणतात, त्यावर भोळे यात्रेकरू कान धरून नाचतात. उजवे हाताला देवाचें शेजघर आहे, तेथें देवाचा पलंग, बिछाना वगैरे सामान आहे. यात्रेकरू आपले शक्तीप्रमाणें देवाची पूजा, नैवेद्य व ब्राम्हणभोजन करवितात. महापूजा करविल्यास देवाला सर्व अलंकार मोत्याच्या घोंगडीसुद्धां दाखवितात. गरीब लोकांना गुडीचा पाडवा व दसरा ह्या दोन दिवशीं महापूजा घोंगडीसुद्धां फुकट पहाण्यास सांपडते. विठोबापुढें जें ठेवितात तें निम्में **बडवे** व निम्में **पुजारी** ह्याप्रमाणें घेतात. रखमाई पुढें ठेविलेलें सर्व **उत्पात** घेतात. नदींत **पुंडलिक, वेणूनाद, व नारद** ह्यांचीं देवळें असून शिवाय किरकोळ देवळें आहेत. विठोबास रोज पहाटेस कांकडआरती होते, मग बारा वाजेपर्यंत लोकांच्या पूजा व नैवेद्य होतात, व संध्याकाळीं शेजारती होते. आरतीचे वेळीं पुष्कळ बायका जमून देवाचीं फार उत्तम गाणीं गातात. येथें आषाढ शुद्ध ११ व कार्तिक शुद्ध ११ रोजीं फार मोठी यात्रा भरते. फार लांबचे लोक येतात. यात्रेच्या वेळीं देवदर्शनाकरितां दर माणशीं चार आणे कर द्यावा लागतो. दिवसा १२ वाजतां रथोत्सव होतो. गांवापासून एक कोसावर **गोपाळपुरा** म्हणून गांव आहे, तेथेंही विठोबाचें मोठें देऊळ असून पौर्णिमेच्या दिवशीं गोपाळकाल्याचा समारंभ होतो, नंतर तेथून लाह्या व दहीं घेऊन यात्रेकरू जातात. यात्रे

करून नगरप्रदक्षिणा करितात, ती दीड कोसांची आहे. उत्सव संपल्यावर विठोबाची **प्रक्षालनपूजा** होते, म्हणजे पुष्कळ पाणी तापवून साखर, दूध, व दहीं आणून विठोबाला पंचामृत स्नान घालितात. चंद्रभागानदींत **वेणुनाद** म्हणून रुप्यानें मढविलेल्या दोन पादुका असून गायीच्या खुराच्या व देवाच्या पावलाच्या खुणा आहेत तेथें ब्राम्हणभोजन किंवा श्राद्ध केलें असतां फार पुण्य आहे. यात्रेकरू निघते वेळीं देवाचा प्रसाद म्हणून कुंकू, डाळें, व बुक्का आणितात. पंढरपूर हा गांव बराच मोठा असून नेहमीं बाजार चांगला असतो, व तालुक्याचें ठिकाण असल्यामुळें मामलेदार वगैरे अंमलदार आहेत. येथील उपाध्ये यात्रेकरूंचे नांव वगैरे आपल्या वह्यांत त्यांचे हातून लिहून घेतात. पंढरपुराहून परत येतांना तेथून आलीकडे दीड कोसावर **बेटावरला महादेव** म्हणून स्थान आहे. तेथें देव खेळण्याची जागा फार चमत्कारिक असून पहाण्यासारखी आहे.

## जगन्नाथ.

सर्व यात्रेमध्यें जगन्नाथजीची यात्रा फार महत्वाची आहे असें समजून कित्येक लोक त्या यात्रेस जातात. हिंदुस्थानच्या पूर्वसमुद्राच्या किनाऱ्यावर **कटक** जिल्ह्यांत **ओरिसा** प्रांतांत उत्तर अक्षांश १९ ४९ व पूर्वरेखांश* ८५ ५४ ह्या ठिकाणीं **जगन्नाथपुरी** म्हणून गांव आहे. तेथें जाण्यास लोक आगगाडीनें **भुसावळेस** जातात. भुसावळ येथें **नागपुरास** जाण्याला एक रेल्वेचा फांटा फुटतो, त्यास **बेंगाल–नागपूर रेल्वे** म्हणतात. ह्या रेल्वेनें नागपुरास जावें. नागपुराहून त्याच रेल्वेनें **संबळपूर रोड** स्टेशना पावेतों जावें. मध्यें वाटेंत जीं मोठालीं स्टेशनें लागतात तीं **कामटी, डोंगरगड, रायपूर, बिलासपूर, रायगड.** संबळपूर रोड स्टेशनावर उतरून बैलगाडी करून दीड दिवसांचे रस्त्या-

* ह्या उपोद्घातांतील रेखांश ग्रिनिच शहरांतून जाणाऱ्या याम्योत्तरापासून मोजलेले आहेत.

वर **संबळपूर** आहे, तेथें जावें. येथें **महानदी** म्हणून एक नदी आहे, त्या ठिकाणीं नावेंत बसून **कटक** येथें जावें. पावसाळ्यांत नदीस पाणी पुष्कळ असतें, तेव्हां पांच दिवस लागतात; व पाणी थोडें असल्यास सुमारें पंधरा दिवस लागतात. नावेंत जातांना वाटेंत सोयीच्या ठिकाणीं उतरून जेवणखाण व मुक्काम करितात. कटकपासून बैलगाडींत सुमारें पंचवीस कोस जगन्नाथपुरीला जावें लागतें. वाटेंत **पंडे** म्हणजे तेथील उपाध्ये भेटून यात्रेकऱ्यांना नेतात, व यात्रेची सर्व तजवीज ठेवितात. पंडे हे ओढिआ ब्राम्हण आहेत. जगन्नाथपुरी ह्या गांवांत **जगन्नाथजीचें** फार मोठें मंदिर तांबड्या दगडाचें असून त्याचे गाभाऱ्यांत सिंहासनावर **जगन्नाथ, बळभद्र,** व **सुभद्रा** ह्या तीन देवांच्या चंदनी लांकडाच्या मूर्ति सुमारें सहा सहा फूट उंचीच्या उभ्या आहेत. देवळांतील सभामंडपाच्या छतास एक एकादशीची बाहुली करून ती उलटी टांगून ठेवलेली आहे, म्हणून येथें एकादशीचा उपास करीत नाहींत. ह्या तीन मूर्तींविषयीं असें सांगतात कीं, ज्या वर्षीं अधिक आषाढ येतो त्या वर्षीं समुद्रांतून चंदनाचें लांकूड वहात येतें. त्या वेळीं गांवचा इंद्रद्युम्न राजा, सुतार व कुंभार असे तिघे देवळांत बसून सुताराकडून त्या लांकडाच्या तीन मूर्ति नवीन करवितात, आणि जुन्या मूर्ति समुद्रांत टाकून त्यांचे जागीं नव्या मूर्ति बसवितात. ह्या मूर्ति थोट्या आहेत. ह्याचें कारण असें सांगतात कीं, प्रथम तेथील राजाचे मनांत असें आलें कीं, जगन्नाथजीचें देऊळ बांधून मूर्ति बसवावी. तेव्हां जगन्नाथजी देवानेंच सुताराचें रूप घेऊन राजापाशीं येऊन आम्ही एक महिन्यांत जगन्नाथजीची मूर्ति तयार करून देतों म्हणून सांगितलें, तेव्हां लांकडें वगैरे सामान घेऊन सुतार एका खोलींत बसून एक महिनापर्यंत दार बंद ठेवण्यास सांगितलें. सुमारें पंचवीस दिवस झाले, तोंपर्यंत आंत कांहीं काम चालल्याचें समजण्यांत येईना, म्हणून राजानें खोली उघडिली, तेव्हां आंत सुतार नव्हता; परंतु

तिन्ही मूर्ति बनलेल्या असून त्यांच्या हाताचीं बोटें तयार व्हावयाचीं राहिलीं होतीं. त्या तशाच मूर्तीची स्थापना केली. ही गोष्ट कलियुगाचे आरंभीं झाली असें म्हणतात. यात्रेकरू येथें गेले म्हणजे देवाचें दर्शन घेतात, व शक्तीप्रमाणें पंड्यांना दक्षिणा देतात. येथें पैसे देऊन देवाला पंड्याकडून **अटका** ( म्हणजे नैवेद्य ) करवितात. अगदीं कनिष्ठप्रतीचा अटका केल्यास ३४ रुपये पडतात. येथें सोंवळ्याओंवळ्याचा विचार अगदींच नसून पाहिजे त्याचा अटका पाहिजे तो खातो. मनांत शंका आणिल्यास कांहीं बाधा होते व ती साक्षीगोपाळाचें दर्शन घेतलें म्हणजे नाहींशी होते असें म्हणतात. गांवांत चारपांच हजार घरांची वस्ती आहे. गांवांत मुसलमान लोकांना येऊं देत नाहींत. लोक **ओढिया भाषा** बोलतात, तथापि पंडे दुभाषी असतात. बाजारांत तुरीची डाळ, तांदूळ, उत्तम पोहे, साखर, तूप वगैरे सर्व जिनसा व आयते तयार केलेले लाडू, मालपोवा, अशा जिनसा मिळतात; फक्त मसुराची डाळ विकीत नाहींत. यात्रेकरू निराळा स्वयंपाक मुळींच करीत नाहींत, व एकादशीचे दिवशींही अटक्याचा प्रसाद म्हणजे भात वगैरे घेऊन खातात. फाल्गूनमासीं **फुलडोलची** यात्रा, ज्येष्ठमासीं **चंदनाची** यात्रा, व आषाढमासीं **रथ** यात्रा भरते. त्या वेळीं उत्सव मूर्ति रथांत बसवून सुमारें दीड मैलावर **जनकपूर** गांव आहे तेथें मिरवीत नेऊन परत आणितात. रथ फार मोठा असून सुमारें तीस हात उंच आहे. येथें तीर्थें आहेत तीं–देवळाजवळ **रोहिणीकुंड** व **श्वेतगंगाकुंड** असून **मार्कंडेयतलाव, इंद्रद्युम्नकुंड** व **महोदधिसमुद्र** हीं थोडे अंतरावर आहेत. मार्कंडेयतलाव जनकपुरी नजीक आहे. जगन्नाथाचे पांच कोस अलीकडे **साक्षीगोपाळाचें** देऊळ आहे. त्याजविषयीं अशी गोष्ट सांगतात कीं, एक ब्राम्हणाचा मुलगा जगन्नाथजीचे दर्शनास जाऊन आला, तेव्हां त्यास दुसऱ्यांनीं विचारिलें " तू जगन्नाथाचें दर्शन केलें म्हणतोस त्यास प्रमाण काय "! तेव्हां त्यानें साक्षीगोपाळास दाखवून

" माझा साक्षीदार हा आहे " असें सांगितलें. त्यावर गोपाळानें त्याप्रमाणें साक्ष दिली. येथेंही कोणी कोणी अटका करवितात. जगन्नाथाचे आलीकडे तीन कोसांवर तुळसीचवडा म्हणून ठिकाण आहे. त्याविषयीं असें सांगतात कीं, तुळसीदास येऊन उतरले होते, तेथें जगन्नाथजी पंड्याचें रूप घेऊन आले, त्यावेळीं तुळसीदास ह्यांनीं देवाचें महात्म्य विचारिलें असतां त्या पंड्यानें असें सांगितलें कीं, जगन्नाथजीचें दर्शन घेतलें असतां ब्राम्हणाचे जन्माशिवाय दुसरा जन्म येत नाहीं व धनाढ्य होऊन वेदपाठी होतो. ह्याविषयीं असा श्लोक म्हणतात कीं, " जगन्नाथमुखं दृष्ट्वा पद्मनाभंजनार्दनं । कोटिजन्म भवेद्विप्रो धनाढ्यो वेदपारगः " तेव्हां तुळसीदास म्हणाले कीं, ब्राह्मणाचे पुष्कळ जन्म वगैरे मिळाले तरी मरण चुकत नाहीं, तेव्हां फायदा काय ? तेव्हां पंड्यानें असें सांगितलें कीं, " मार्कंडेयवटे कृष्णारोहिण्यांच महोदधौ इंद्रदवने कुरुते स्नानं पूनर्जन्म न विद्यते " तेव्हां तुळसीदास देवाचे दर्शनास गेले. यात्रेकरू परत येतांना देवाचा प्रसाद म्हणून वाळलेला भात व जगन्नाथजीचा पट घेऊन येतात. येथील हवा उष्ण आहे, खरूज व तोंड येते, व भेलग्याचा व पाय मोठा होण्याचा उपद्रव आहे. तथापि यात्रेकरू तेथें थोडे दिवस असल्यामुळें त्यास उपद्रव होत नाहीं. इंग्रजांचा अंमल असून शाळा, कोर्टें, वगैरे आहेत. उन्हाळ्यांत जे यात्रेकरू जातात ते संबळपूर रोड स्टेशनापर्यंत न जातां त्याच्या आलीकडे रायपूर स्टेशनावर उतरून बैलगाडीनें जातात. वाटेंत चोरांचें फार भय असल्यामुळें पुष्कळ लोक जमून जातात, एकटे दुकटे जात नाहींत.

ह्याप्रमाणें यात्रा करून घरीं आल्यावर लोक काशीच्या मावंद्याप्रमाणें ह्याही यात्रेचें मावंदे करितात.

अशा प्रकारें यात्रा, देवदर्शनें व साधूंची संगत केल्यानें मनुष्याचें चित्त शुद्ध होतें. चित्त शुद्ध झाल्यावर त्याला ब्रम्हज्ञान होण्याचा अधिकार येतो. मग ब्रम्हज्ञानानें ब्रह्माची प्राप्ति होऊन तो मुक्त होतो.

---

# तैत्तिरीयोपनिषत्.

## शिक्षावल्ली.

श्रीवेदव्यासाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ अस्या उपनिषदः रविमंडलगो विष्णुर्ब्रम्हा वरुणो भृगुश्चेति क्रमादृषयश्चत्वारः । स एव हरिर्देवता । वाक्यरूपत्वान्न छंदोन्वेषणं । शन्नोमित्र आवहंतीत्यादौ छंदोबद्धस्थलेऽक्षरगणनयाऽनुष्टुबादिर्ज्ञेयं ॥

अर्थ—लक्ष्मीनारायणास नमस्कार असो. गुरूला नमस्कार असो. ह्या उपनिषदाचे ऋषी क्रमेंकरून सूर्यमंडलांत असलेला विष्णु ब्रम्हदेव वरुण व भृगु हे चौघे आहेत, व देवता हरि आहे. वाक्यरूप असल्यामुळें ह्या उपनिषदाला छंद नाहीं. "शन्नोमित्रः" व "आवहंती" इत्यादि ज्या ठिकाणीं छंद आहेत, त्या ठिकाणीं अक्षरें मोजून अनुष्टुप् इत्यादि छंद होतात असें जाणावें.

हरिः ॥ ॐ ॥ शंनोमित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णु रुरुक्रमः । नमो ब्रम्हणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रम्हासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारम् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥१॥ सत्यं वदिष्यामि पञ्च च ॥ १ ॥ इति प्रथमोऽनुवाकः ॥

अद्वैतटीका—विद्याप्राप्त्युपसर्गाणां प्रशमार्थं शांतिं पठति ॥ शंन इति॥ मित्रः प्राणवृत्तेरन्हश्चाभिमानी देवतात्मा नः अस्माकं शं सुखं भवतु । वरुणः अपानवृत्तेरात्रेश्चाभिमानी देवतात्मा अस्माकं शं सुखं भवतु ।

**अर्यमा** चक्षुरादित्ययोरभिमानी **नः** अस्माकं **शं** सुखं **भवतु । इंद्रः** बलाभिमानी च **बृहस्पतिः** वाग्बुध्योरभिमानी **नः** अस्माकं **शं** सुखं भवतु। **उरुक्रमः** विस्तीर्णक्रमः **विष्णुः** पादयोरभिमानी **नः** अस्माकं **शं** सुखं भवतु । **ब्रम्हणे** सर्वक्रियाफलानां तदधीनत्वाद्ब्रह्मवायुस्तस्मै **नमः** प्रव्हीभावं करोमि । हे **वायो ते** तुभ्यं **नमः** अस्तु । **त्वं एव प्रत्यक्षं** चक्षुराद्यपेक्ष्यबाह्यं सन्निकृष्टमव्यवहितं **ब्रम्ह असि।** तस्मात् **त्वां एव प्रत्यक्षं ब्रम्ह-वदिष्यामि।** यथाशास्त्रं यथाकर्तव्यं बुद्धौ सुपरिनिश्चितमर्थं तदपि त्वदधीनत्वात्त्वामेव **ऋतं वदिष्यामि** । वाक्कायाभ्यां संपाद्यमानोऽर्थस्त्वदधीन एव अतः त्वामेव **सत्यं वदिष्यामि। तत्** सर्वात्मकं वाय्वाख्यं मयैव स्तुतं ब्रम्ह विद्यार्थिनं **मां** विद्यासंयोजनेन **अवतु । तत्** ब्रम्ह **वक्तारं** आचार्यं वक्तृत्वसामर्थ्यसंयोजनेन **अवतु । मां अवतु। वक्तारं अवतु। ॐ शांतिः** अस्तु। **शांतिः** अस्तु । **शांतिः**[1] [2] अस्तु ।। १ ।। इति प्रथमोऽनुवाकः ।।१।।

**अर्थ**—[ ब्रम्हविद्या मिळवितांना ज्या अडचणी येतात त्या नाहींशा करण्याकरितां शांतीचा मंत्र म्हणतो. ] प्राण व दिवस ह्यांची अभिमानी देवता मित्र हा आम्हाला सुखकारक होवो. अपान व रात्र ह्यांची अभिमानी देवता वरूण हा आम्हाला सुखकारक होवो. चक्षु व सूर्य ह्यांची अभिमानी देवता अर्यमा हा आम्हाला सुखकारक होवो. बलाची अभिमानी देवता इंद्र व वाणी आणि बुद्धि ह्यांची अभिमानी देवता बृहस्पति हे दोघे आम्हाला सुखकारक होवोत. दोन पादांची अभिमानी देवता मोठा पराक्रमी विष्णु आम्हाला सुखकारक होवो. सर्व क्रियांची फळें ब्रम्हाच्या स्वाधीन असल्यामुळें ब्रम्ह हें वायु आहे, त्याला नमस्कार करतों. हे वायु, तुला नमस्कार असो. तूं चक्षुरादिकांच्या संबंधानें बाहेरचें जवळ असलेलें व मध्यें कांहीं प्रतिबंध नसलेलें असें ब्रम्ह आहेस, म्हणून तुलाच मी प्रत्यक्ष ब्रम्ह असें म्हणतों. जें कर्म शास्त्राला व कर्तव्या-

१ पुनर्वचनमादरार्थं ।
२ त्रिर्वचनमाध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकानां तापानां प्रशमार्थं ।

ला अनुसरून आहे असा बुद्धीमध्यें निश्चय झाला आहे तें कर्म तुझ्या स्वाधीन असल्यामुळें तुलाच मी ऋत असें म्हणतों. वाणी व शरीर ह्यांनीं जें कार्य होतें तें तुझ्या स्वाधीन असल्यामुळें तुलाच मी सत्य असें म्हणतों. ज्याची मीं स्तुति केली असें सर्वव्यापी व वायुनामक ब्रम्ह मला विद्या देऊन संरक्षण करो. तें ब्रम्ह गुरूला वक्तृत्वसामर्थ्य देऊन त्याचें रक्षण करो. माझें संरक्षण करो[1]. वक्त्याचें संरक्षण करो[1]. शांति असो, शांति असो, शांति असो[2] ॥ १ ॥ ह्याप्रमाणें पहिला अनुवाक संपला ॥ १ ॥

**द्वैतटीका**—ब्रम्हविद्यामभ्यसन् भृगुःविघ्ननिवारणार्थं देवान् प्रार्थयते ॥ शन्नोमित्र इत्यादिना ॥ **मित्रः नः** अस्माकं **शं** सुखकरः भवतु । **वरुणः** नः **शं** सुखकारकः भवतु । **अर्यमा** सूर्यः **नः** अस्माकं **शं** सुखकरः **भवतु । इंद्रः बृहस्पतिः नः शं** सुखकारकः भवतु । **उरुक्रमः विष्णुः नः शं** सुखकरः भवतु । ब्रम्हविद्याप्रवर्त्तकेषु मुख्यत्वात् परब्रम्हणो मुख्याधिष्ठानत्वाच्च तं स्तुवन् पृथक् प्रार्थयते ॥ नम इत्यादिना ॥ **ब्रम्हणे** परब्रम्हाधिष्ठानाय ज्ञानादिगुणबृंहिताय ब्रम्हपदवाच्यायेति वा **नमः ।** अध्यात्मरूपं नत्वाऽधिदैवतं नमति ॥ नमस्त इति ॥ **वायो** अधिदैवतवायुदेव **ते** तुभ्यं **नमः** वाण्यै[3] नमः अस्तु । हे वायो **त्वं एव प्रत्यक्षं** प्रत्यक्षभूतप्राणापानादिवायुवृत्तिशरीरकत्वात् प्रत्यक्षरूपः **ब्रम्हा[4] असि ।** अभिमन्यमानोक्तिरेव अभिमान्युक्तिरितितदभिप्रायेणाह ॥ त्वमेवेति ॥ **त्वां एव** त्वमेव **प्रत्यक्षं** नियामकतया सर्वेंद्रियस्थं इति प्रत्यक्षं[6] **ब्रम्ह** गुणपूर्ण इति **वदिष्यामि ।** त्वामेव **ऋतं** यथार्थज्ञानवंतं **वदिष्यामि । सत्यं**

---

१ आदरास्तव पुनः तसेंच म्हटलें आहे.

२ आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ह्या तीन तापांचा नाश होण्याकरितां तीन वेळां शांति असें म्हटलें आहे.

३ प्राणो ब्रम्ह कं ब्रम्ह खं ब्रम्हेति श्रुतेः

४ वाग्वै ब्रम्हेति श्रुतेः

५ अथ कस्मादुच्यते ब्रम्हेति बृहंतो गुणा यस्मिन्निति श्रुतेः

६ प्रतिपरसमनुभ्योऽक्ष्णः इति टच् समासांतः

यथार्थज्ञानपूर्वककर्तारं **वदिष्यामि । तत्** परब्रम्ह **मां अवतु । तत् वक्तारं अवतु** रक्षतु । **मां अवतु । वक्तारं अवतु । ॐ** ॐपदवाच्येन विष्णुना **शांतिः शांतिः शांतिः** अस्तु ॥ १॥ इतिप्रथमोऽनुवाकः ॥ १ ॥

**अर्थ**—[ भृगुऋषि विघ्नांचा नाश व्हावा म्हणून देवांची प्रार्थना करतो.] मित्रदेवता आम्हाला सुख देणारी होवो. वरुणदेव आम्हाला कल्याणकारक होवो. सूर्य आम्हाला सुख देवो. इंद्र, बृहस्पति, महापराक्रमी विष्णु हे आमच्या पाठामध्ये येणारीं विघ्नें दूर करून आम्हाला सुख देणारे होवोत. [ परब्रम्ह हें ब्रम्हविद्या प्रवर्तन करणाऱ्यांमध्यें मुख्य आहे व सर्वांचा आश्रय आहे, म्हणून त्याची स्तुति करून पृथक् प्रार्थना करतो. ] अनंत गुणांनीं परिपूर्ण अशा परब्रम्हाला माझा नमस्कार असो. हे वायुदेवा, तुला नमस्कार असो. (व देहामध्यें प्राण, अपान, इत्यादि वायूंना नियमन करणाऱ्या वायूंसही नमस्कार असो). हे वायु, तूं प्रत्यक्ष ब्रम्ह आहेस. [ ज्याचा अभिमान करावयाचा त्या वस्तूनें अभिमान करणारा देव घ्यावा अशा अभिप्रायानें सांगतो. ] हे वायु, सर्वेंद्रियांमध्यें राहून त्यांचें नियमन करण्यास तूं समर्थ आहेस. म्हणून तुला मी ब्रम्ह असें म्हणतों. तूंच यथार्थ ज्ञानवान् आहेस असें मी म्हणतों. यथार्थ ज्ञानपूर्वक क्रिया करणारा तूंच आहेस असें मी म्हणतों. तें परब्रम्ह माझें रक्षण करो. माझ्या गुरूचें रक्षण करो. माझें रक्षण करो. गुरूचें रक्षण करो. विष्णूच्या योगानें शांति असो, शांति असो, शांति असो ॥ १ ॥

**ॐ शीक्षां व्याख्यास्यामः । वर्णः स्वरः । मात्रा बलम् । साम सन्तानः । इत्युक्तः शीक्षाध्यायः ॥ १ ॥ शीक्षां पञ्च ॥२॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥**

**अद्वैतटीका**—अर्थज्ञानप्रधानत्वादुपनिषदो ग्रंथपाठे यत्नोपरमो मा-

१ प्रत्येकं क्रियाभ्यास आदरार्थः.

भूदिति शीक्षाध्याय आरभ्यते ॥ ॐ शीक्षामिति ॥ **शीक्षां**[1] शिक्ष्यते वर्णाद्युच्चारणलक्षणमनयेति शिक्षा ताम् **व्याख्यास्यामः** विस्पष्टमासमंतात्कथयिष्यामः। तत्र **वर्णः** अकारादिः। **स्वरः** उदात्तादिः। **मात्रा** ऱ्हस्वाद्याः। **बलं** प्रयत्नविशेषः। **साम** वर्णानां मध्यमवृत्त्योच्चारणं समता। **संतानः** संततिः संहितेत्यर्थः। **इति शीक्षाध्यायः** शिक्षा यस्मिन्नध्याये सोऽयं शीक्षाध्यायः **इत्युक्तः** एवमुक्तः ॥ १ ॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

**अर्थ**—[ उपनिषदाचा अर्थ समजणें ही मुख्य गोष्ट असल्यामुळें त्याचा अभ्यास करण्याला कमी प्रयत्न होऊं नये म्हणून शीक्षाध्यायास आरंभ करितों. ] जिच्या योगानें अकारादि वर्णांच्या उच्चाराचें ज्ञान होतें ती शीक्षा स्पष्टपणें सांगतों. त्या शिक्षेत अकारादिक ( बावन ) वर्ण, उदात्तादिक ( तीन ) स्वर, ऱ्हस्व इत्यादि ( तीन ) मात्रा, प्रयत्न, वर्णांचा मध्यम रीतीनें उच्चार करणें, संहिता, हें सांगितलें आहे. ह्याप्रमाणें शीक्षाध्याय सांगितला ॥ १ ॥ ह्याप्रमाणें दुसरा अनुवाक संपला ॥ २ ॥

**द्वैतटीका**—ब्रम्हविद्याभ्यासार्थिनः पूर्वंशिक्षणीयमर्थं प्रतिज्ञापूर्वमाह ॥ शीक्षामिति ॥ **शीक्षां**[3] शिक्ष्यत इति शिक्षणीयमर्थं **व्याख्यास्यामः** विविच्य स्पष्टं वक्ष्यामः। **वर्णः** अकरादिवर्णोच्चारस्थानानि कंठताल्वादीनि ज्ञातव्यानि। **स्वरः** उदात्तादिः ज्ञातव्यः। **मात्रा** एकमात्रादिः ज्ञातव्यः। **बलं** वर्णोच्चारणप्रयत्नो विवृतादिः ज्ञातव्यः। **साम** वर्णानां संधिः ज्ञातव्यः। **संतानः** वर्णमाला ज्ञातव्या। न केवलं वर्णोत्पत्तिस्थानादिकमेव ज्ञातव्यं किंतु वरणीयत्वहेतुना वर्णनामकं वर्णस्थं वर्णवाच्यं परमात्मरूपं ध्येयं। स्वस्मिन् रमत इति व्युत्पत्त्या उदात्तादिस्वरनामकं स्वरवाच्यं परमात्मस्वरूपं ध्येयं। मानानि मितात् त्रायत इति व्युत्पत्त्या मात्रानामकं मात्रास्थितं ज्ञेयं। बलं

१. दैर्घ्यं छांदसं।

२. चक्षिङो वा ख्यात्रादिष्टस्य व्याङ्पूर्वस्य व्यक्तत्वात्कर्मेण एतद्रूपं।

३ शीक्षेति दैर्घ्यं छांदसं बोध्यं।

४ मानात् मितात् त्रायत इति व्युत्पत्तेः।

बलस्थं ज्ञेयं । साम सर्वरूपेषु समत्वहेतुना सामनामकं ज्ञेयं । संतानः गुणादिना संततत्वनिमित्तेन संताननामकं वर्णसंततिस्थं ज्ञेयं। **इति शीक्षाध्यायः** अध्याय इति ग्रंथसंदर्भनामशिक्षणीयोऽर्थो यस्मिन् अध्याये सः **उक्तः** ॥ १ ॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

**अर्थ**--[ ब्रम्हविद्येचा अभ्यास करणाऱ्यास प्रथमतः शिकण्याजोगा अर्थ सांगतो.] शिकण्याजोगा अर्थ स्पष्ट करून सांगतो. वर्ण म्हणजे अकार उकार इत्यादि उच्चारण करण्याचीं कंठ, ओष्ठ इत्यादि स्थानें. स्वर म्हणजे उदात्त, अनुदात्त इत्यादि. मात्रा म्हणजे ऱ्हस्वाची एक मात्रा, दीर्घाच्या दोन मात्रा, इत्यादि. बल म्हणजे वर्णाचें उच्चारण करण्यास लागणारा विवृत संवृत इत्यादि प्रयत्न. साम म्हणजे वर्णावर्णामध्यें होणारा संधिप्रकार. संतान म्हणजे वर्णांची एकसारखी परंपरा. नुसते वर्णच जाणावयाचे एवढें नाहीं; तर भक्तांनीं वरण्यास योग्य परमात्मा आहे म्हणून तो वर्ण शब्दानें वाच्य आहे, स्वतःमध्येंच रमण पावतो म्हणून तो परमात्मा स्वरशब्दानें वाच्य आहे, मानापासून ( प्रपंचापासून ) रक्षण करतो म्हणून तो परमात्मा मात्राशब्दानें वाच्य आहे, बलामध्यें राहणारा परमात्मा आहे, सर्व ठिकाणीं समबुद्धीनें राहतो म्हणून तो सामशब्दानें वाच्य आहे, अनंत गुणांच्या परंपरेनें युक्त आहे म्हणून तो संतानशब्दानें वाच्य आहे. ह्याप्रमाणें शिक्षाध्याय सांगितला ॥ १ ॥ ह्याप्रमाणें दुसरा अनुवाक संपला ॥ २ ॥

**सह नौ यशः । सह नौ ब्रम्हवर्चसम् । अथातः सꣳहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः ॥ पञ्चस्वधिकरणेषु । अधिलोकमधिज्योतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम् । ता महासꣳहिता इत्याचक्षते । अथाधिलोकम् । पृथिवी पूर्वरूपम् । द्यौरुत्तररूपम् । आकाशः सन्धिः ॥ १ ॥**

**अद्वैतटीका**--अधुना संहितोपनिषदुच्यते ॥ सहनाविति ॥ उपनिषज्ज्ञाननिमित्तं **यशः नौ** आवयोः शिष्याचार्ययोः **सह** एव अस्तु । तन्नि-

मित्रं च **ब्रम्हवर्चसं** तेजः **नौ सह** एव अस्तु । **अथ** अनंतरं **अतः** बुद्धिसौकर्यहेतोः **संहितायाः उपनिषदं** संहिताविषयं दर्शनं **पंचसु अधिकरणेषु** ज्ञानविषयेषु आश्रयेषु **व्याख्यास्यामः** । तान्यधिकरणान्याह ॥ अधिलोकमिति॥ **अधिलोकं** लोकेष्वधि यद्दर्शनं तत् **आधिज्योतिषं अधिविद्यं अधिप्रजं** च **अध्यात्मं** । **ताः** एताः पंचविषयाः उपनिषदः **महासंहिताः इति** वेदविदः **आचक्षते** कथयंति । अथ तासां महासंहितानां मध्ये **अधिलोकं** दर्शनमुच्यते । **पृथ्वी पूर्वरूपं** पूर्वो वर्णः। **द्यौः उत्तररूपं** उत्तरवर्णः। **आकाशः** अंतरिक्षलोकः **संधिः** पूर्वोत्तररूपयोर्मध्यं ॥ १ ॥

**अर्थ**—[ आतां संहितेतील उपनिषत् सांगतो. ] उपनिषदाचे ज्ञानापासून मिळणारें यश आपणा दोघांस ( म्हणजे गुरुशिष्यांस ) बरोबर मिळो. उपनिषदाचे ज्ञानापासून मिळणारें ब्रम्हतेज आपणा दोघांस बरोबर मिळो. आतां सुलभतेनें बोध होण्यासाठीं उपनिषदांतील विषयाचें ज्ञान पांच अधिकरणांत सांगतो. [ तीं अधिकरणें सांगतो. ] १ अधिलोक, २ अधिज्योतिष, ३ अधिविद्य, ४ अधिप्रज, व ५ अध्यात्म. हे पांच विषय ज्या उपनिषदांत सांगितले आहेत त्यांस वेदवेत्ते महासंहिता असें म्हणतात. आतां त्या महासंहितेपैकीं अधिलोकाचें ज्ञान सांगतो. पृथ्वी पूर्वरूप आहे. स्वर्ग उत्तररूप आहे. आकाश त्या दोघांचा जोड आहे ॥ १ ॥

**द्वैतटीका**—सः प्रागुक्तो मित्रादिः **नौ** गुरुशिष्ययोः **सह यशः** यशस्करः **नौ** गुरुशिष्ययोः **ब्रम्हवर्चसं**[3] ब्रम्हवर्चस्करः **सह** साहित्येन भवतु। इदानीं सामेति प्रकृतवर्णसंधिनिष्ठां ब्रम्हविद्यामाह ॥ अथेति ॥ **अथ** वर्णादिशिक्षोक्त्यनंतरं **अतः** फलत्वात् **संहितायाः** पूर्वोत्तरवर्णसंधिसंधान-

१ दर्शनक्रमविवक्षार्थोऽथशब्दः सर्वत्र ।
२ संधीयेते पूर्वोत्तररूपेअस्मिन्निति ।
३ ब्रम्हहस्तिभ्यांवर्चस इति समासांतः प्रत्ययः ।

भेदेन चतूरूपायाः संहितायाः **उपनिषदं** रहस्यं प्रतिपाद्यत्वेन तन्निष्ठत्वेन वा स्थितं रूपजातं **व्याख्यास्यामः** विविच्य कथयामः । व्याख्यास्यमानस्य संहितारूपजातस्य स्थानान्याह ॥ पंचस्विति ॥ **पंचसु अधिकरणेषु** स्थितामुपनिषदं व्याख्यास्यामः । तान्यधिकरणानि क्रमेणाह ॥ अधिलोकमिति ॥ **अधिलोकं**[1] लोकेषु अधि **अधिज्योतिषं** ज्योतिष्षु अधि **अधिविद्यं** विद्यासु अधि **अधिप्रजं** प्रजासु अधि **अध्यात्मं** आत्मनि अधि क्रमेण नारायणप्रद्युम्नसंकर्षणवासुदेवानिरुद्धादिरूपपंचकं संहिताप्रतिपाद्यत्वेन व्याख्यास्यामः इति समुदायार्थः । आदर जननाय संहितीस्तौति ॥ ता इति ॥ ताः उक्तभगवद्रूपप्रतिपादकाः पूर्वोत्तरवर्णसंधिसंधानभेदेन चतुरात्मकाः सकलवेदगताः संहिताः **महासंहिताः** महतः ब्रम्हणः प्रतिपादकतया महासंहिताः **इति आचक्षते**। अधिलोकमित्याद्युक्तं विवृणोति ॥ अथाधिलोकमिति ॥ **अथ अधिलोकं** लोकेषु अधि । **पृथिवी**[2] पृथिवीस्थितं पृथिवीनामकं नारायणवासुदेवाख्यं रूपं **पूर्वरूपं** संहितायाः पूर्ववर्णेन रूप्यते निरूप्यते प्रतिपाद्यते । **द्यौः** द्युलोकस्थं द्युनामकं नारायणसंकर्षणाख्यं रूपं **उत्तररूपं** प्राग्वदुत्तरवर्णप्रतिपाद्यं । **आकाशः** आकाशस्थं आकाशनामकं नारायणप्रद्युम्नाख्यं **संधिः** सन्निकर्षप्रतिपाद्यं ॥ १ ॥

**अर्थ**—पूर्वी सांगितलेल्या मित्रादि देवता आम्हां गुरुशिष्यांचें यश बरोबरच विस्तृत करोत, व आम्हांगुरुशिष्यांचें ब्रम्हतेज बरोबरच विस्तृत करोत. [ आतां सर्व ठिकाणीं समरूपानें आहे म्हणून सामनामक परमात्म्यानें अधिष्ठित वर्ण, संधि, ह्यांमध्यें असलेली ब्रम्हविद्या सांगतों.] वर्ण इत्यादि शिक्षा सांगितल्यावर सकल असल्यामुळें, पूर्वरूप, उत्तररूप, संधि, वसंधान, ह्या चार प्रकारच्या संहितेचें अतिरहस्य, (अथवा संहितेनें प्रतिपादन केलेलें भगवंताचें रूपांच्या समुदायाचें विवरण) पृथक्

१ अधिलोकं अधिज्योतिषं अधिविद्यं अधिप्रजं अध्यात्ममिति सर्वत्र सप्तमीविभक्त्यर्थेऽव्ययीभावसमासः सप्तम्यर्थस्यैव द्योतकोऽधिरुपसर्गः ।

२ प्रतिपाद्यप्रतिपादकाभेदाभिप्रायेण पृथिवीपूर्वरूपमित्याद्युक्तिः ।

पृथक् रीतीनें स्पष्ट करून सांगतो. [आतां चार प्रकारच्या संहितेची निरनिराळीं स्थानें सांगतो.] पांच अधिकरणांवर (ह्मणजे आधारांवर) राहिलेल्या उपनिषदाची व्याख्या सांगतो. [ तीं अधिकरणें क्रमानें सांगतो.] लोकामध्यें नारायण नांवाचा परमात्मा, ज्योतिषावर (ह्मणजे तेजस्वी सूर्यादि लोकावर) प्रद्युम्न नांवाचा परमात्मा, विद्येच्या आश्रयावर संकर्षण नांवाचा परमात्मा, सर्व प्रजांचे ठिकाणीं वासुदेव नांवाचा परमात्मा, आत्म्याचे ठिकाणीं अनिरुद्ध नांवाचा परमात्मा, हीं परमात्म्याचीं पांच रूपें संहितेमध्यें सांगितलेलीं आहेत. [ आतां संहितेचा आदर करण्यास्तव तिची स्तुति करतो.] पूर्व व उत्तर संधि व संधान अशा या चार प्रकारच्या संहितेमधील जीं भगवंताचीं रूपें आहेत तींच परब्रम्हाचीं प्रतिपादक आहेत, म्हणून हिला महासंहिता असें म्हणतात. [ अधिलोक इत्यादि जें सांगितलें त्याचें विवरण करितो. ] आतां अधिलोकाविषयीं सांगतो. पृथ्वीत राहणारें पृथिवी नांवाचें नारायणवासुदेवनामक रूप हें संहितेचें पूर्वरूप (ह्मणजे प्रथमतः प्रतिपादन करण्याजोगें) आहे. स्वर्ग लोकांत राहणारें द्यु नांवाचें नारायणसंकर्षणनामक रूप हें संहितेचें उत्तररूप (म्हणजे उत्तरभागीं प्रतिपादन करण्याजोगें) आहे. आकाशांत राहणारें आकाश नांवाचें नारायणप्रद्युम्नरूप हें संहितेची संधि (म्हणजे सन्निकर्षाचें प्रतिपादन करण्याजोगें) आहे ॥ १ ॥

**वायुः सन्धानम् । इत्यधिलोकम् । अथाधिज्योतिषम् । अग्निः पूर्वरूपम् । आदित्य उत्तररूपम् । आपः सन्धिः । वैद्युतः सन्धानम् । इत्यधिज्योतिषम् । अथाधिविद्यम् । आचार्य्यः पूर्वरूपम् ॥ २ ॥**

**अद्वैतटीका—वायुः संधानं** संधीयते अनेनेति । **इति अधिलोकं** दर्शनमुक्तं । **अथ अधिज्योतिषं** ज्योतिष्वधि यद्दर्शनं तदुच्यते । **अग्निः पूर्वरूपं । आदित्यः उत्तररूपं । आपः संधिः । वैद्युतः**

**संधानं । इति अधिज्योतिषं** दर्शनमुक्तं । **अथ अधिविद्यं** विद्यायामधियद्दर्शनं तदुच्यते । **आचार्यः पूर्वरूपं ॥ २ ॥**

**अर्थ**—वायु हा त्या दोघांस जोडणारा आहे. ह्याप्रमाणें अधिलोकांविषयींचें ज्ञान सांगितलें. आतां अधिज्योतिषाचें ज्ञान सांगतों. अग्नि पूर्वरूप आहे. सूर्य उत्तररूप आहे. उदक त्या दोघांचा जोड आहे. विद्युल्लता त्या दोघांस जोडणारी आहे. ह्याप्रमाणें अधिज्योतिषाविषयींचें ज्ञान सांगितलें. आतां अधिविद्येविषयींचें ज्ञान सांगतों. गुरु पूर्वरूप आहे. ॥ २ ॥

**द्वैतटीका—वायुः** वायुस्थं वायुनामकं नारायणानिरुद्धाख्यं रूपं **संधानं** संधिकार्यप्रतिपाद्यं इति यद्वा पृथिव्यादिचतुर्षु[1] स्थितानि पृथिव्यादिनामकानि नारायणवासुदेवनारायणसंकर्षणनारायणप्रद्युम्ननारायणानिरुद्धाख्यानि चत्वारि रूपाणि संहितायाः पूर्वोत्तरवर्णसंधिसंधानेषु तिष्ठंति । **इति अधिलोकं । अथ** अधिलोककथनानंतरं **अधिज्योतिषं** ज्योतिषि अधि कथ्यते । **अग्निः** पृथिवीगताग्निस्थं अग्निनामकं वासुदेववासुदेवाख्यं स्वरूपं संहितायाः **पूर्वरूपं** पूर्ववर्णप्रतिपाद्यं पूर्ववर्णस्थमिति वा । **आदित्यः**[2] द्युलोकस्थादित्यगतं आदित्यनामकं वासुदेवसंकर्षणात्मकं **उत्तररूपं** संहितायाः उत्तररूपं । **आपः** अप्सु स्थितं अम्नापकं वासुदेवप्रद्युम्नात्मकं रूपं **संधिः** संन्निकर्षप्रतिपाद्यं । **वैद्युतः**[3] विद्युत्समूहगतं वैद्युताख्यं वासुदेवानिरुद्धाख्यं **संधानं । इति अधिज्योतिषं** ज्योतिषि अधिगतं भगवत्स्वरूपं ज्ञेयं । **अथ** अधिज्योतिषकथनानंतरं **अधिविद्यं** विद्यायामधि कथ्यते ॥ आचार्य इति ॥ **आचार्यः**[4] आचार्यस्थं आचार्यनामकं संकर्षणवासुदेवात्मकं रूपं **पूर्वरूपं ।** संहितायाः पूर्वरूपं ॥ २ ॥

---

१ अत्र पृथिव्यादीनां अभिमानिनयन्यायेन देवतापरत्वमुपेत्य पृथिवीदेवतास्थमित्यादिरर्थ इत्याहुः ।

२ दित्यदित्यादित्यपत्युत्तरपदाण्ण्य इति सूत्रेण ण्यप्रत्ययः ।

३ विद्युतः अयमित्यर्थे तस्येदमित्यण् ।

४ आङुपसर्गपूर्वात् चरधातोः सकाशात् ऋहलोर्ण्यदित्यनेन सूत्रेणण्यत्प्रत्ययः ।

अर्थ—वायूमध्यें राहणारें वायु नांवाचें नारायणअनिरुद्धनामक रूप हें संहितेचें संधान (म्हणजे संधीचें कार्य) आहे. (अथवा पृथिवी, स्वर्ग, आकाश, वायु, ह्या चोहोंमध्यें पृथिव्यादिनामक भगवंताचीं नारायणवासुदेव, नारायणसंकर्षण, नारायणप्रद्युम्न, नारायणअनिरुद्ध हीं चार स्वरूपें संहितेच्या पूर्वरूप, उत्तररूप, संधि, व संधान ह्या चार ठिकाणीं आहेत). अशा रीतीनें अधिलोकांविषयीं विचार झाला, [लोकांमधील भगवंताचीं रूपें सांगितल्यावर ज्योतिषावरील भगवंताचीं रूपें सांगतों.] पृथ्वीवरील अग्नीमध्यें राहणारें अग्निनामक वासुदेव वासुदेव नांवाचें रूप संहितेचें पूर्वरूप आहे (म्हणजे संहितेच्या पूर्व वर्णानें प्रतिपादन करण्यास योग्य आहे). स्वर्गलोकामधील सूर्यामध्यें राहणारें सूर्य नांवाचें वासुदेवसंकर्षणनामकरूप संहितेचें उत्तररूप आहे. उदकामध्यें राहणारें उदक नामक वासुदेवप्रद्युम्न नांवाचें रूप संधि (म्हणजे संबंधानें प्रतिपादन करण्यास योग्य आहे). विद्युल्लतेच्या समुदायामध्यें राहणारें विद्युत् नांवाचें वासुदेवअनिरुद्ध नामक भगवंताचें रूप संधान आहे. ह्याप्रमाणें ज्योतिषावरील भगवंताचीं रूपें सांगितलीं. [ज्योतिषामधील भगवंताचीं रूपें सांगितल्यानंतर विद्यासंबंधी भगवंताचीं रूपें सांगतों.] गुरूमधील आचार्य नांवाचें संकर्षणवासुदेव नामक रूप संहितेचें पूर्वरूप आहे ॥ २ ॥

**अन्तेवास्युत्तररूपम्। विद्या सन्धिः। प्रवचनꣳ सन्धानम्। इत्यधिविद्यम्। अथाधिप्रजम्। माता पूर्वरूपम्। पितोत्तररूपम्। प्रजा सन्धिः। प्रजननꣳ सन्धानम्। इत्यधिप्रजम् ॥ ३ ॥**

**अद्वैतटीका—अंतेवासी उत्तररूपं। विद्या संधिः। प्रवचनं संधानं। इति अधिविद्यं** दर्शनमुक्तं। **अथ अधिप्रजं** प्रजामधिकृत्य यद्दर्शनं तदुच्यते। **माता पूर्वरूपं। पिता उत्तररूपं। प्रजा संधिः। प्रजननं संधानं। इति अधिप्रजं** दर्शनमुक्तं ॥ ३ ॥

**अर्थ**—शिष्य उत्तररूप आहे. ज्ञान त्या दोघांचा जोड आहे. व्याख्यान त्या दोघांस जोडणारें आहे. ह्याप्रमाणें अधिविद्येविषयींचें ज्ञान सांगितलें. आतां अधिप्रजेविषयींचें ज्ञान सांगतों. आई पूर्वरूप आहे. बाप उत्तररूप आहे. संतति त्या दोघांचा जोड आहे. मैथुन हें त्या दोघांस जोडणारें आहे. ह्याप्रमाणें अधिप्रजेविषयींचें ज्ञान सांगितलें ॥ ३ ॥

**द्वैतटीका**—**अंतेवासि**[1] अंतेवासिस्थं अंतेवासिनामकं संकर्षणसंकर्षणात्मकं रूपं **उत्तररूपं** संहितायाः उत्तररूपं । **विद्या** गुरुशिष्यसंनिकर्षजं ज्ञानं विद्यानामकं संकर्षणप्रद्युम्नात्मकंरूपं **संधिः** संनिकर्षः। **प्रवचनं** प्रवचनस्थं प्रवचननामकं संकर्षणानिरुद्धाख्यं रूपं **संधानं** संधिकार्यं । **इति अधिविद्यं** । **अथ** अधिविद्यकथनानंतरं **अधिप्रजं** प्रजायामधि कथ्यते ॥ मातेति ॥ **माता** मातृस्थं मातृनामकंप्रद्युम्नवासुदेवात्मकंरूपं **पूर्वरूपं** संहितायाः पूर्वरूपं । **पिता** पितृस्थं पितृनामकं प्रद्युम्नसंकर्षणात्मकं रूपं **उत्तररूपं** संहितायाः उत्तररूपं । **प्रजा**[2] प्रजास्थं प्रजानामकं प्रद्युम्नप्रद्युम्नात्मकंरूपं **संधिः** । **प्रजननं**[3] प्रजननस्थं प्रजनननामकं प्रद्युम्नानिरुद्धात्मकं रूपं **संधानं** संधिकार्यं । **इति अधिप्रजं** प्रजायामधिगतं भगवत्स्वरूपं जातं ॥ ३ ॥

**अर्थ**—शिष्यामधील अंतेवासि नांवाचें संकर्षणसंकर्षणनामक रूप संहितेचें उत्तररूप आहे. गुरु व शिष्य ह्या दोघांच्या सान्निध्यापासून झालेलें ज्ञान हें विद्येमध्यें राहणारें विद्या नांवाचें संकर्षणप्रद्युम्ननामक भगवत्स्वरूप संधि ( ह्मणजे परस्परांशीं संबंध ) आहे. प्रवचन ( म्हणजे अभ्यास ) ह्यांत राहणारें प्रवचन नांवाचें अनिरुद्ध नामक भगवंताचें रूप संधान आहे. [ विद्येच्या ठिकाणीं असलेलें भगवंताचें रूप सांगित-

१ अंतेसमीपेवसतितच्छीलः वसनिवासइत्यस्मात् सुप्यधातौणिनिस्ताच्छील्ये इतिसूत्रेणइनिःप्रत्ययः ।

२ सप्तम्यां जनेर्डइतिसूत्रेणजनधातोर्डप्रत्ययः ।

३ प्रोत्सर्गेतुजनधातोः करणाधिकरणयोश्चेतिसूत्रेणल्युट् प्रत्ययः ।

स्थावर प्रजेच्या ठिकाणीं असलेलें भगवंताचें रूप सांगतो.] आईमध्यें राहणारें मातानामक प्रद्युम्नवासुदेवनामक भगवंताचें रूप संहितेचें पूर्वरूप आहे. बापामध्यें राहणारें पितानामक प्रद्युम्नसंकर्षण नांवाचें भगवंताचें रूप हें उत्तररूप आहे. संततीमध्यें राहणारें प्रजा नांवाचें प्रद्युम्नप्रद्युम्न नांवाचें रूप हें संहितेची संधि आहे. उत्पत्तीमध्यें राहणारें प्रजनन नांवाचें प्रद्युम्नअनिरुद्धनामक भगवंताचें रूपसंधान आहे. ह्याप्रमाणें प्रजेमध्यें राहणारीं भगवंताचीं रूपें सांगितलीं ॥ ३ ॥

**अथाध्यात्मम् । अधराहनुः पूर्वरूपम् । उत्तराहनुरुत्तररूपम् । वाक् सन्धिः । जिव्हा सन्धानम् । इत्यध्यात्मम् । इतीमा महासꣳहिताः । य एवमेता महासꣳहिता व्याख्याता वेद । सन्धीयते प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येणलोकेन ॥ ४ ॥ सन्धिराचार्य्यः पूर्वरूपमित्यधिप्रजं लोकेन ॥ ३ ॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥**

**अद्वैतटीका—अथ अध्यात्मं** आत्मनि अधि यद्दर्शनं तदुच्यते । **अधराहनुः पूर्वरूपं । उत्तराहनुः उत्तररूपं । वाक् संधिः । जिव्हा संधानं । इति अध्यात्मं** दर्शनमुक्तं । **इति इमाः** इत्युक्ताः **महासंहिताः । यः एवं व्याख्याताः एताः महासंहिताः वेद सः प्रजया पशुभिः ब्रम्हवर्चसेन अन्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन संधीयते ॥ ४ ॥**
इतितृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥

**अर्थ**—आतां अध्यात्माविषयींचें ज्ञान सांगतो. खालचें जाभाड पूर्वरूप आहे. वरचें जाभाड उत्तररूप आहे. वाणी त्या दोघांचा जोड आहे. जीभ त्या दोघांस जोडणारी आहे. ह्याप्रमाणें अध्यात्माविषयींचें ज्ञान सांगितलें. ह्याप्रमाणें महासंहिता सांगितल्या. जो ह्याप्रमाणें ह्या महासंहिता जाणतो तो संततीनें, पशूंनीं, ब्रम्हतेजानें, अन्नादिकानें व स्वर्गलोकानें युक्त होतो ॥ ४ ॥ ह्याप्रमाणें तिसरा अनुवाक संपला ॥ ३ ॥

**द्वैतटीका**--**अथ** अधिप्रजकथनानंतरं **अध्यात्मं** आत्मनि देहे अधिकृत्य वर्तमानं भगवत्स्वरूपं कथ्यते ॥ अधराहनुरिति ॥ **अधराहनुः** तत्स्थं तन्नामकं अनिरुद्धवासुदेवात्मकं **पूर्वरूपं । उत्तराहनुः** तत्स्थं तन्नामकं अनिरुद्धसंकर्षणात्मकं **उत्तररूपं। वाक्** वागिंद्रियस्थं वाङ्नामकं अनिरुद्धप्रद्युम्नात्मकं रूपं **संधिः । जिव्हा** तत्स्थं तन्नामकं अनिरुद्धानिरुद्धात्मकं **संधानं** संधिकार्यं । **इति अध्यात्मं** आत्मनि देहेऽधिकृत्य विद्यमानं भगवत्स्वरूपं ज्ञेयं । संहिताः स्तौति ॥ इतीमा इति ॥ **इति** पूर्वोक्तप्रकारेण कथिताः **इमाः महासंहिताः** विष्णुरूपमहार्थकत्वात् महासंहिता इति । न केवलं महार्थकत्वान्महत्वं संहितानां किंतु महाफलत्वाच्च महत्वमितिभावेनायात इत्यत्रातः पदेन सूचितं फलमाह ॥ य एवमिति ॥ **यः** कश्चित् सात्विकोऽधिकारी **एवं व्याख्याताः एताः** नारायणादीन्यनिरुद्धांतानि प्रत्येकं वासुदेवादिचतुरात्मना पृथिव्यादिवर्गपंचकगतानि चतूरूपसंहितास्थानि व्याख्यातानि **महासंहिताः** महासंहितारूपाणि **वेद** उपास्ते साक्षात्करोति च सः **प्रजया** पुत्रपौत्रादिना **पशुभिः** पशूपलक्षितसर्वैश्वर्यैः **ब्रम्हवर्चसेन** ब्रम्हतेजसा **अन्नाद्येन** अन्नादिना **सुवर्गेण लोकेन** श्वेतद्वीपादिविष्णुस्थानेन संधीयते संयुक्तो भवति ॥ ४ ॥ इतितृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥

**अर्थ**—[ प्रजेमधील भगवंताचीं रूपें सांगितल्यावर देहामध्यें राहणारीं भगवंताचीं रूपें सांगतों. ] खालच्या जाभाडांत राहणारें अधराहनु नांवाचें अनिरुद्धवासुदेवरूप हें पूर्वरूप आहे. वरच्या जाभाडामध्यें राहणारें अनिरुद्धसंकर्षण नांवाचें भगवंताचें रूप हें संहितेचें उत्तररूप आहे. वागिंद्रियामध्यें राहणारें अनिरुद्धप्रद्युम्न नांवाचें भगवंताचें रूप व संधि आहे. जिव्हेमध्यें राहणारें अनिरुद्धअनिरुद्ध नांवाचें भगवंताचें रूप हें संधान म्हणजे संधीपासून झालेलें कार्य आहे. ह्याप्रमाणें देहा-

१ प्रजयेत्यादिना स्वयोग्यसर्वभोग उपलक्ष्यते ।

२ ब्रम्हहस्तिभ्यां वर्चस इतिसूत्रेण अच् प्रत्यय विधानाद्ब्रह्मवर्चसेनेति साधु ।

मधील राहणारीं भगवंताचीं रूपें सांगितलीं. [ संहितेची स्तुति करतों. ] ह्या पूर्वी सांगितलेल्या संहिता महासंहिता आहेत, कारण त्या संहितेमध्यें महान् अशा विष्णूचें वर्णन केलें आहे. [ आतां केवळ महान परमात्म्या-चेंच वर्णन केलें म्हणून तिला महासंहिता म्हणतात एवढेंच नाहीं, तर तिचें फलही मोठें आहे, हें फल ' अथातः ' यामध्यें असलेल्या ' अतः ' या शब्दानें सुचविलें आहे. तें फल सांगतों. ] जो कोणी सत्वगुणाचा अधिकारी पूर्वी सांगितल्याप्रमाणें नारायणादिक रूपें प्रत्येकीं वासुदेव इत्यादि चार रूपांनीं पृथिव्यादिक पांच वर्गांमध्यें संहितेच्या चार रूपां-मध्यें राहिलीं आहेत असें जाणतो व त्या परमात्म्याचा साक्षात्कार करून घेतो तो अधिकारी पुत्रपौत्रादिक, पशुद्रव्य इत्यादिक, ब्रह्मतेजज्ञान इत्या-दिक, उत्तम अन्नवस्त्र इत्यादिक, यथेच्छ मिळवून शेवटीं भगवंताच्या श्वेतद्वीप, अनंतासन, व वैकुंठ ह्यांपैकीं आपल्या योग्यतेनुरूप एका लोकीं जातो ॥ ४ ॥ ह्याप्रमाणें तिसरा अनुवाक संपला ॥ ३ ॥

**यश्छन्दसामृषभो विश्वरूपः। छन्दोभ्योऽध्यमृतात्सम्ब-भूव। स मेन्द्रो मेधया स्पृणोतु। अमृतस्य देवधारणो भूयासम्। शरीरं मे विचर्षणम्। जिव्हा मे मधुमत्तमा। कर्णाभ्यां भूरि विश्रुवम्। ब्रम्हणः कोशोसि मेधया ऽपि-हितः श्रुतं मे गोपाय। आवहन्ती वितन्वाना ॥ १ ॥**

**अद्वैतटीका**–मेधाकामस्य श्रीकामस्य च तत्प्राप्तिसाधनं जपहोमावुच्ये-ते। तत्रादौ मेधाकामस्य जपार्थान् मंत्रानाह॥ यश्छंदसामिति॥ **यः छंदसां** वेदानां **ऋषभः** श्रेष्ठः **विश्वरूपः** सर्वरूपः सर्ववाग्व्याप्तेः यश्च **छंदोभ्यः** वेदेभ्यः **अमृतात् अधि संबभूव सः** एवंभूतः ॐकारः **इंद्रः** सर्वकामेशः परमेश्वरः **मा** मां **मेधया** प्रज्ञया **स्पृणोतु** प्रीणयतु बलयतु वा। प्रज्ञाबलं हि प्रार्थयते॥ अमृतस्येति॥ हे **देव** अहं **अमृतस्य** अमृतत्वहेतुभूतस्य ब्रह्मज्ञानस्य **धारणः** धारयिता **भूयासं** भवेयं। किंच **मे** मम **शरीरं**

**विचर्षणं** विचक्षणं भूयात्[1]। **मे** मम **जिव्हा मधुमत्तमा** अतिशयेन मधुरभाषिणी भूयात् । अहं **कर्णाभ्यां** श्रोत्राभ्यां **भूरि** बहु **विश्रुवं** व्यश्रवं श्रोता भूयासं । आत्मज्ञानयोग्यः कार्यकारणसंघातोऽस्त्वित्यर्थः । मेधा च तदर्थमेव प्रार्थ्यते ॥ ब्रम्हण इति ॥ हे देव त्वं **मेधया** लौकिकप्रज्ञया **पिहितः** आच्छादितः **ब्रम्हणः** परमात्मनः **कोशः** असेरिवोपलब्ध्यधिष्ठानत्वात् **असि**। त्वं हि ब्रम्हणः प्रतीकं त्वयि ब्रम्होपलभ्यते । **हे देव मे** मम **श्रुतं** श्रवणपूर्वकमात्मज्ञानादिकं **गोपाय** रक्ष तत्प्राप्त्यविस्मरणादि कुर्वित्यर्थः । अधुना श्रीकामस्य होमार्था मंत्रा उच्यंते ॥ आवहंतीति ॥ हे देव **आवहंती** आनयंती **वितन्वाना** विस्तारयंती ॥ १ ॥

**अर्थ**— [ ज्याला बुद्धि व संपत्ति पाहिजे त्याला ती मिळण्याचीं साधनें जप व होम हे सांगतों. त्यांपैकीं ज्यास बुद्धि पाहिजे त्यानें जपावयाचे मंत्र सांगतों. ] जो वेदामध्यें श्रेष्ठ, सर्व शब्दांना व्यापून असणारा, अमर वेदापासून उत्पन्न झालेला, तो ओंकाररूप परमेश्वर मला चांगली बुद्धि देवो. [ बुद्धिबळ मिळण्यास्तव प्रार्थना करितों. ] हे परमेश्वरा, जेणेंकरून मोक्ष मिळतो तें ब्रम्हज्ञान मला मिळो, आणि माझें शरीर निरोगी राहो, आणि माझी जीभ गोड बोलणारी होवो, व माझे कान पुष्कळ ऐकोत. सारांश ब्रम्हज्ञान मिळविण्याचीं साधनें चांगलीं राहोत. [ आत्मज्ञानासाठीं बुद्धि मिळण्याकरितां प्रार्थना करितों. ] हे देवा, जशी म्यानानें तरवार आच्छादित असते तसा तूं लौकिकबुद्धीनें आच्छादित आहेस, तूं ब्रम्हाची मूर्ति आहेस, तुझ्या ठिकाणीं ब्रम्ह दृष्टोत्पत्तीस येतें. हे देवा, मीं श्रवणादिकेंकरून मिळविलेल्या आत्मज्ञानाचें रक्षण कर ( म्हणजे त्या ज्ञानाचें मला विस्मरण होऊं देऊं नको ). [ आतां ज्याला संपत्ति मिळावी अशी इच्छा आहे त्यानें होम करण्यासाठीं मंत्र सांगतों. ] हे देवा मला नसेल तें आणून देणारी, माझें असेल तें वाढविणारी ॥ १ ॥

[1] भूयादिति प्रथमपुरुषविपरिणामः ।

**द्वैतटीका**—विद्याभ्यासिनो मेधाप्राप्त्यर्थं कांचनविद्यामाह ॥ यश्छंदसामिति ॥ **यः इंद्रः** परमेश्वरः **छंदसां ऋषभः** अधिपतिः नियंतेतियावत् **विश्वरूपः** पूर्णविग्रहस्वरूपः नानारूप इति वा[1] **अमृतात् अधि** अमृतेभ्यः **छंदोभ्यः** नित्येभ्यो वेदेभ्यः अधि **संबभूव** अधिकतया सुष्ठु व्यक्तः **सः इंद्रः मा** मां **मेधया** प्रज्ञया **स्पृणोतु**[2] प्रीणयतु प्रीणनं बलं बलयतु मेधाविनं करोतु । हे **देव अमृतस्य** नित्यस्य देवस्य **धारणः** धारकः **भूयासं** तत्वज्ञानी भूत्वा क्षिप्रं युक्तः स्यामितिभावः । **मे शरीरं विचर्षणं** विशिष्टाः चर्षणाः प्रजाः यस्य तत् विशिष्टशिष्यप्रजायुक्तं भूयात्[3] । **मे जिव्हा मधुमत्तमा** अतिशयेन मधुमती मधुरभाषिणी सुखसाधनभगवद्बोधकवेदोच्चारणवती भूयादित्यर्थः । **कर्णाभ्यां भूरि विश्रुवं** विशेषेण शृणवै इति । हे देव त्वं **ब्रम्हणः** वेदस्य **कोशः** आवासः **असि । मेधया** प्रज्ञया **पिहितः** आच्छादितः संपूर्णज्ञानः असि । **मे** मया **श्रुतं गोपाय**[4] रक्ष ॥ १ ॥

**अर्थ**—[ विद्याभ्यास करणाऱ्याला बुद्धि मिळण्यासाठीं विद्या सांगतों. ] सर्व वेदांचा नियंता, सर्व पूर्ण मूर्तिमान् ( अथवा अवतार घेऊन नानाप्रकारचीं रूपें धारण करणारा ), नित्य वेदापासून स्पष्टपणें लोकास माहीत झालेला असा जो इंद्र नांवाचा परमेश्वर तो इंद्र मला उत्तम बुद्धि देवो. हे देवा, मी उत्तम प्रकारचा तत्वज्ञानी होऊन तुमच्या कृपेनें फारच लवकर मुक्त होवो. मला नानाप्रकारचे शिष्य व पुत्र होवोत. माझी जिव्हा अतिशय मधुर भाषण करणारी होवो ( अथवा उत्तम सुखाचें साधन व भगवंताचें ज्ञान करून देणारें असे वेद म्हणणारी होवो ). मी आपल्या कानांनीं भगवंताच्या गुणाविषयीं उत्तम गोष्टी

---

१ इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयत इति श्रुतेः ।

२ स्पृत् प्रीतिरक्षणयोरिति कविकल्पद्रुमोक्तेः ।

३ भूयादिति विपरिणामेनान्वयः इति भावः ।

४ गुपू रक्षणे गुपूधूपविच्छिपणिपनिभ्य आयइति आयप्रत्ययस्तस्माल्लोण्मध्यमपुरुषैकवचनं ।

ऐको. हे देवा, तूं वेदाचें रहाण्याचें ठिकाण आहेस. तूं उत्तम रीतीच्या बुद्धीनें पूर्ण आहेस. हे देवा, मी आजपर्यंत जें ऐकिलें तें सर्व माझें ज्ञान तूं रक्षण कर ॥ १ ॥

**कुर्वाणाचीरमात्मनः । वासांसि मम गावश्च । अन्नपाने च सर्वदा । ततो मे श्रियमावह । लोमशां पशुभिः सह स्वाहा । आमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा । विमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा । प्रमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा । दमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा । शमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा ॥ २ ॥**

**अद्वैतटीका—आत्मनः चीरं**[1] चिरं **वासांसि च मम गावः गाः च** अन्नपाने एवमादीनि **कुर्वाणा** या श्रीः **लोमशां** अजाव्यादियुक्तां **पशुभिः सह** अन्यैश्च पशुभिः संयुक्तां तां **श्रियं ततः** मेधानिर्वर्तनात्परं **मे** मह्यं **आवह** आनय **स्वाहा** । अमेधसो हि श्रीरनर्थायैवेति । **ब्रह्मचारिणः मा** मां **आयंतु** आगच्छंतु **स्वाहा । ब्रह्मचारिणः मा** मां **वियंतु स्वाहा । ब्रम्हचारिणः मा** मां **प्रयंतु स्वाहा । ब्रम्हचारिणः दमायंतु स्वाहा । ब्रम्हचारिणः शमायंतु स्वाहा ॥ २ ॥**

**अर्थ**—मला नेहमीं वस्त्रें देणारी, मला गाई व अन्नपाणी इत्यादि देणारी, आणि शेळ्या व मेंढया इत्यादिकांनीं युक्त असलेली व दुसऱ्या पशूंनीं युक्त असलेली, अशी जी श्री ती मला चांगली बुद्धि दिल्यानंतर मिळवून दे ( असा मंत्र म्हणून आहुती द्यावी ). कारण ज्याला बुद्धि नसते त्याला संपत्तीपासून अनर्थ प्राप्त होतो. ब्रम्हाचा अभ्यास करणारे मजकडे चोहोंकडून येवोत ( असा मंत्र म्हणून आहुती द्यावी ). ब्रम्हाचा अभ्यास करणारे मजकडे विशेषेंकरून येवोत ( असा मंत्र म्हणून आहुती द्यावी ). ब्रम्हाचा अभ्यास करणारे मजकडे येवोत.

---

१ दैर्घ्यछांदसं

( असा मंत्र म्हणून आहुति द्यावी ). ब्रम्हाचा अभ्यास करणारे बाहेरील इंद्रियांचा निग्रह करोत ( असा मंत्र म्हणून आहुति द्यावी ). ब्रम्हाचा अभ्यास करणारे आंतील इंद्रियांचा निग्रह करोत ( असा मंत्र ह्मणून आहुति द्यावी ) ॥ २ ॥

**द्वैतटीका**—विद्याभ्यासिनो मनःक्षोभनिरासाय अन्नादिना भाव्यमतस्तदर्थं कांचनविद्यामाह ॥ आवहंतीति ॥ **आत्मनः** जीवजातस्य **चिरं** सर्वभोगान् **आवहंती** आनयंती **वितन्वाना**[1] विस्तारयंती **मम सर्वदा वासांसि च गावः च अन्नपाने कुर्वाणा** यतःततः **लोमशां**[2] लोमवतीं **श्रियं मे** मम **पशुभिः सह आवह** मयि आनय ततः **स्वाहा**[3]। अथाभ्यस्ता विद्या प्रवचनादधिकफलाय भवति प्रवचनं च शिष्यापेक्षं अतः शिष्यसंपत्तये कांचनविद्यामाह ॥ आमेति ॥ **ब्रम्हचारिणः मा** मां प्रति **आयंतु स्वाहा** सुष्ठु आव्हानं भवतु। **ब्रम्हचारिणः विमायंतु** विशिष्टतया जानंतु। **ब्रह्मचारिणः प्रमा** प्रकृष्टज्ञानवंतः **यंतु** प्राप्नुवंतु **स्वाहा। ब्रम्हचारिणः दमाः**[4] इंद्रियनिग्रहवंतः **यंतु**[5] प्राप्नुवंतु **स्वाहा। ब्रम्हचारिणः शमाः** भगवन्निष्ठावंतः **यंतु** प्राप्नुवंतु **स्वाहा** ॥ २ ॥

**अर्थ**—[ विद्येचा अभ्यास करणाऱ्याचें मन बिघडूं नये ह्याकरितां चांगलें अन्नवस्त्र इत्यादि पाहिजे. तें सर्व मिळण्याकरितां एक विद्या सांगतों. ] जीवांना लागणारे जे उपभोगाचे पदार्थ आहेत ते सर्व पदार्थ आणून देणारी व त्यांची वृद्धि करणारी, वस्त्र, गाई, अन्न, पाणी हे नेहमीं देणारी, अशी संपत्ति, पशुसहवर्तमान माझे जवळ राहो. वेदांनीं प्रतिपादन केलेली

---

१ विपूर्वात्तनोतेर्लटः शानच उविकरणं यणादेशः विस्तारवतीत्यर्थः।

२ लोमादिपामादिपिच्छादिभ्यःशनेलचइतिमत्वर्थे शप्रत्ययः।

३ सुष्ठु आहूयते वेदैः प्रतिपाद्यत इति स्वाहेत्युक्त सुआङित्युपसर्गद्वयपूर्वकात् व्हयतेः कर्माणि डाप्रत्यये वलोपेच स्वाहेति सिद्धेः शब्दस्वाभाव्यादव्ययत्वं।

४ दमाः दमशब्दात् अर्शआदिभ्योऽच् इति अच्प्रत्ययः।

५ इण्गतावितिं धातोर्लोटि प्रथमपुरुषबहुवचनं।

लक्ष्मी देवता आहे. [ विद्येचा अभ्यास केल्यावर ती विद्या दुसऱ्याला शिकविल्यानें अधिक फल देणारी होते. आतां शिकविण्याकरितां विद्यार्थी पाहिजेत, म्हणून आपल्याला पुष्कळ शिष्य मिळावेत ह्याकरितां एक विद्या सांगतो. ] ब्रम्हचर्यानें राहणारे विद्यार्थी माझ्याजवळ येवोत. ते विद्यार्थी माझ्याजवळ येऊन उत्तम ज्ञान संपादन करोत. ते विद्यार्थी आपल्या इंद्रियांचा निग्रह करणारे होवोत. त्याप्रमाणेंच ते विद्यार्थी भगवंतावर निष्ठा ठेवणारे असोत ॥ २ ॥

**यशो जनेऽसानि स्वाहा । श्रेयान् वस्यसोऽसानि स्वाहा । तं त्वा भग प्रविशानि स्वाहा । स मा भग प्रविश स्वाहा । तस्मिन्सहस्रशाखे । निभगाऽहं त्वयि मृजे स्वाहा । यथाऽऽपः प्रवता यन्ति । यथा मासा अहर्जरम् । एवं मां ब्रम्हचारिणः । धातरायन्तु सर्वतः स्वाहा । प्रतिवेशोऽसि प्रमा भाहि प्रमा पद्यस्व ॥ ३ ॥ वितन्वाना शमायन्तु ब्रम्हचारिणः स्वाहा धातरायन्तु सर्वतः स्वाहैकञ्च ॥ ४ ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥**

**अद्वैतटीका**—अहं **जने** जनसमूहे **यशः** यशस्वी **असानि** भवानि **स्वाहा** । अहं **वस्यसः** वसुमत्तरात् **श्रेयान्** प्रशस्यतरः **असानि स्वाहा** । हे **भग** भगवन् अहं **तं त्वा** त्वां **प्रविशानि स्वाहा** । हे **भग सः** त्वमपि **मा** मां **प्रविश स्वाहा** । हे **भग अहं सहस्रशाखे** बहुभेदे **तस्मिन्** त्वयि **निमृजे** शोधयामि पापकृत्यां । **यथा** लोके **आपः प्रवता** निम्नवता देशेन **यंति** गच्छंति । **यथा** वा **मासाः** चैत्रादयः **अहर्जरं** अहोभिः परिवर्त्तमानो लोकान् जरयति अहानि जीर्यंत्यस्मिन्निति वा अहर्जरः तं संवत्सरं **यंति** । **एवं** तथा हे **धातः ब्रम्हचारिणः मां सर्वतः** सर्वदिग्भ्यः **आयंतु स्वाहा** । हे धातः त्वं **प्रतिवेशः** श्रमापनयनस्थानं सर्वपापदुःखापनयनस्थानमिति यावत् **असि** । अतः **मा** मां

प्रति आत्मानं प्रभाहि प्रकाशय । च मा मां प्रपद्यस्व शरविद्धमिवलोहं त्वन्मयं कुर्वित्यर्थः। अस्मिन् विद्याप्रकरणे अभिधीयमानः श्रीकामो धनार्थं । धनं च कर्मार्थं । कर्म च उपात्तदुरितक्षयाय । तत्क्षये हि विद्या प्रकाशते इति फलितोर्थः ॥ ३ ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

**अर्थ**—हे देवा, मी लोकांमध्यें यशस्वी व्हावें (असा मंत्र म्हणून आहुति द्यावी ). मी श्रीमंताहून श्रीमंत व्हावें (असा मंत्र म्हणून आहुति द्यावी). हे भगवंता, मी तुझ्यामध्यें शिरून एकरूप व्हावें ( असा मंत्र म्हणून आहुति द्यावी). हे भगवंता, तूंही माझ्यामध्यें प्रवेश कर (असा मंत्र म्हणून आहुति द्यावी). हे भगवंता, ज्याचे बहुत भेद आहेत अशा तुझ्या ठिकाणीं मी आपलें पाप धुवून नाहींसें करितों. जसें पाणी उतरत्या जाग्यांतून जातें, आणखी जसे महिने वर्षामध्यें जातात, तसे, हे भगवंता, ब्रम्हविद्येचा अभ्यास करणारे मजकडे सर्व दिशेकडून येवोत ( असा मंत्र म्हणून आहुति द्यावी ). हे भगवंता, तूं सर्व पापापासून होणाऱ्या दुःखाचा नाश करणारा आहेस. म्हणून मला तूं आपलें स्वरूप प्रकाशित कर. आणखी जसा बाण व त्याच्या टोंकाला असलेलें लोखंडाचें फळ ह्या दोहोंचा एक जीव झालेला असतो, तसा तूं मला त्वद्रूप कर. ह्या विद्याप्रकरणांत लक्ष्मीची इच्छा करणारा जो सांगितला आहे तो धनाकरितां लक्ष्मीची इच्छा करितो, यज्ञयागादि कर्माकरितां धनाची इच्छा करितो, केलेल्या पापाच्या नाशाकरितां चांगलीं कर्मे करण्याची इच्छा करितो, पापाचा नाश झाल्यावर ज्ञान होतें,[२] असा ह्या प्रकरणाचा सारांश जाणावा ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें चवथा अनुवाक संपला ॥ ४ ॥

---

१ तथाच स्मृतिः ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः । यथाऽऽदर्शतले प्रख्ये पश्यन्त्यात्मानमात्मनि ॥

२ ह्याविषयीं अशी स्मृति आहे कीं, जसें स्वच्छ आरशामध्यें आपण आपल्याला पहातों, तसें पापकर्मांचा क्षय झाल्यानंतर मनुष्यांना ज्ञान उत्पन्न होतें.

**द्वैतटीका—यशः** यशस्वी **जने** जनेषु **असानि**[1] भवानि **स्वाहा**[3]। पुनस्तदेव प्रार्थयते ॥ श्रेयानिति ॥ **वस्य** सुखस्य विषये **श्रेयान्** प्रशस्ततरः श्रेष्ठः **सः** अहं **असानि स्वाहा** अविरतसुखवान् भवामि। तयात्वे एव मनसोऽक्षोभे नित्यं प्रवचनं भवति नान्यथेत्यर्थः। हे **भग** हे षड्गुण **तं** ब्रम्हकोशादिगुणकं मया प्रार्थितं **त्वा** त्वां प्रति **प्रविशानि स्वाहा**। हे **भग सः** त्वं **मा** मां **प्रविश स्वाहा**। फलमाह ॥ तस्मिन्निति ॥ हे **भग सहस्रशाखे** सहस्राणि शाखा इव शाखा रूपाणि यस्य **तस्मिन् त्वयि अहं** पापं **निमृजे** प्रक्षालये त्वदुपासनादिना निवृत्तकल्मषो मुक्तो-भवानीतिभावः। शिष्यागमनम् प्रयत्नेनास्त्विति सदृष्टांतमर्थयते ॥ यथेति ॥ **यथा आपः पर्वतान्** निम्नभूमिं प्रति **यंति** प्राप्नुवंति। **यथा अहर्जरं** अहानि जीर्यंत्यत्रेति संवत्सरं प्रति **मासाः** यंति प्राप्नुवंति। **एवं हे धातः मां ब्रम्हचारिणः सर्वतः आयंतु** प्राप्नुवंति **स्वाहा**। हे भग त्वं **प्रतिवेशः** प्रवेष्टुं योग्यः **असि** श्रमापनयनस्थानं **असि**। **मा** मां प्रति **प्रभाहि** व्यक्तोभव। **मा** मां प्रति **प्रपद्यस्व** मयि संनिहितो भव। **शं वितन्वाना ब्रम्हचारिणः मा** मां प्रति **यंतु स्वाहा**। हे **धातः** ब्रम्हचारिणः **सर्वतः आयंतु एकं च स्वाहा** ॥ **३** ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

**अर्थ**—लोकांमध्ये मी यशस्वी व्हावें. [ पुनः तेंच मागतो. ] सुखाच्या संबंधानें मी उत्तम सुखी असावें. तसें उत्तम सुख चोहोंकडून असलें म्हणजे मनास क्षोभ न होतां शिष्याला शिकविणें एकसारखें चालतें, नाहीं तर होत नाहीं. हे षड्गुण पूर्ण परमेश्वरा, तूं सर्व गुणांनीं परिपूर्ण आहेस, तुझ्याजवळ मी येतों अशी माझी प्रार्थना आहे, तसेंच तूं माझ्याजवळ ये. [ ह्याचें फळ सांगतो. ] ज्यानें अवतार घेऊन हजारों रूपें घेतलीं आहेत असा तूं परमात्मा आहेस. अशा तुझ्या ठिकाणीं

---

१ यश इत्यत्र मतुपो लोपश्छांदसः।
२ अस्तेर्लोटि उत्तमपुरुषैकवचनं।
३ स्वाहेति अभ्यासआदरार्थः।

मी ध्यान, उपासना, सेवा, इत्यादिक करून पाप धुवून टाकून मुक्त होईन. [शिष्य आयासाशिवाय सहज आपल्याकडे येवोत हें दृष्टांतपूर्वक मागतो.] ज्याप्रमाणें पाणी पर्वतापासून निघालें असतां तें सहजच सखल जमिनी-कडे जातें, अथवा ज्याप्रमाणें वर्षामध्यें महिने एकसारखे सहज जातात, त्याप्रमाणें, हे सर्वांना पालन करणाऱ्या ( अथवा धारण करणाऱ्या ) पर-मेश्वरा, मला चोहोंकडून विद्यार्थी येवोत. हे षड्गुण पूर्ण परमेश्वरा, ह्या प्रपंचांत नानाप्रकारच्या दुःखानीं थकून गेलेल्या जीवांचे श्रम दूर कर-ण्याकरितां तूं विश्रांति घेण्याचें स्थान आहेस. असा तूं मला स्पष्ट हो. मला तुझा साक्षात्कार होवो. चोहोंकडून येणारे विद्यार्थी उत्तम प्रकारचें कल्याण भोगणारे होवोत. हे परमेश्वरा, मला विद्यार्थी चोहोंकडून ये-वोत ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें चवथा अनुवाक संपला ॥ ४ ॥

भुर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्त्रो व्याहृतयः । तासामु ह स्मैतां चतुर्थीं । माहाचमस्यः प्रवेदयते । मह इति । तद्ब्रम्ह । स आत्मा । अङ्गान्यन्या देवताः । भूरिति वा अयं लोकः । भुव इत्यन्तरिक्षम् । सुवरित्यसौ लोकः ॥ १ ॥

**अद्वैतटीका**—अधुना व्याहृत्यात्मनो ब्रम्हणोऽन्तरुपासनं स्वाराज्य-फलं प्रस्तूयते ॥ भूर्भुवः सुवरिति ॥ **भूः भुवः सुवः इति एताः तिस्रः व्याहृतयः** संति **वै** । **तासां** मध्ये **माहाचमस्यः मह इति एतां चतुर्थीं** व्याहृतिं **प्रवेदयते उ ह स्म** विदितवान् । **तत् ब्रम्ह । सः आत्मा । अन्याः** इतराः व्याहृतयः **अंगानि** लोकादेवा-वेदाः संति । देवलोकादयः सर्वे व्याहृत्यात्मनो हिरण्यगर्भस्य अवयवाः संति ते च आदित्यचंद्रब्रम्हान्नभूतेन व्याप्यंते इत्याह ॥ भूरिति ॥ **अयं लोकः भूः इति वै । भुवः इति अंतरिक्षं । सुवः इति असौ लोकः** स्वर्गलोकः ॥ १ ॥

---

१ इति आर्षानुस्मरणार्थं ।

**अर्थ**—[ आतां ब्रम्हप्राप्तीचें फळ देणारे असें व्याहृतिरूप ब्रम्हाचें अंतरुपासन ( म्हणजे सूक्ष्म उपासना ) सांगतों. ] भूः भुवः व सुवः ह्याप्रमाणें तीन व्याहृति आहेत. त्यांच्याशिवाय मह ही चवथी व्याहृति माहाचमस्य ऋषीनें जाणली. ती व्याहृति ब्रम्ह आहे, तो आत्मा आहे. इतर ज्या तीन व्याहृति त्या मह ह्या व्याहृतीचीं लोक देव व वेद अशीं अंगें आहेत. [ देव लोक इत्यादि सर्व व्याहृतिरूप ब्रम्हाचे अवयव आहेत, आणि ते सूर्यचंद्र ब्रम्ह ( म्हणजे वेद ) व अन्न ह्यांत आहेत असें सांगतों. ] भू ही मृत्युलोक आहे. भुव ही अंतरिक्षलोक आहे. सुव ही स्वर्गलोक आहे ॥ १ ॥

**द्वैतटीका**—वेदविद्याभ्यासार्थिनः तत्प्राप्त्यर्थं तत्पूर्वभाविनीं व्याहृतिनिष्ठोपास्तिमाह ॥ भूर्भुवः सुवरिति ॥ **भूः** सद्रूपत्वात् तच्छब्दवाच्यः परमात्मा । **भुवः** भु भूरि वं वीर्यं यस्येति । **सुवः** सुष्ठु वं बलं यस्येति सुबलरूपत्वात् । **इति वै** निश्चयेन **एताः तिस्रः व्याहृतयः** परमात्मनो व्याहरणात् व्याहृतिशब्दवाच्यः परमात्मा इति ज्ञेयः । **तासां** व्याहृतीनां मध्ये **महः** पूर्णत्वात् महः **इति एतां चतुर्थीं माहाचमस्यः** ब्रम्हा **प्रवेदयते**[३] जानाति **उ ह स्म** । **महः** महत्वात् तच्छब्दवाच्यः **इति तत् ब्रम्ह** । **सः** वासुदेवः **आत्मा** मध्यदेहः । **अन्याः देवताः** अनिरुद्धप्रद्युम्नसंकर्षणरूपाः देवताः **अंगानि** शिरोबाहुपादरूपांगानि । भुवं इति वर्णद्वयप्रतिपाद्यं प्रद्युम्नरूपद्वयं बाहुतया सुव इति वर्णद्वयप्रतिपाद्यं संकर्षणरूपद्वयं पादद्वयतयास्तीत्यर्थः । भूरादिशब्दचतुष्टयवाच्यरूपचतु-

१ विशेषेणाहरंति विष्णुभक्तं प्रतीति ।

२ चमदित्यव्ययात् करोत्यर्थे असप्रत्यये अव्ययानां भमात्रे टिलोप इति लोपे चमस इति सिद्धेः महाशब्देन समासे महाचमसशब्देनातिचमत्कृतित्वात् व्याहृतिचतुष्टयप्रतिपाद्यः परमात्मोच्यते तं महाचमसं याति जानातीत्यर्थे ण्यप्रत्यये आदिवृद्धौ यस्येति पूर्वांतलोपे माहाचमस्यः व्याहृत्यर्थपरमात्मज्ञानी ब्रम्हेतिध्येयं ।

३ विद् ज्ञाने इत्यस्मात् णिचश्चेत्यात्मनेपदं ।

४ भूशुत्थिचिंतयोरिति विकल्पद्रुमोक्तेः चिंतार्थकस्य भूधातोः क्विपि ज्ञानरूपत्वात् भूवराहाविति छांदोग्यभाष्योक्तेश्च ।

ष्टयस्य लोकज्योतिर्वेदप्राणाख्यवर्गचतुष्टयरूपस्थानां नामान्याह ॥ भूरित्यादिना ॥ **अयं लोकः** भूलोकः समीपस्थसर्वाधारत्वहेतुभ्यां भूलोकनामा भूलोकस्थः अनिरुद्धः **भूः इति** भूरित्युक्तः अनिरुद्धात्मा अनिरुद्धानिरुद्धः **वै** इति प्रसिद्धः । **अंतरिक्षं** अंतरीक्षणीयत्वहेतुना अंतरिक्षनामा अंतरिक्षस्थः अनिरुद्धः **भुवः इति** भुवशब्दवाच्यः प्रद्युम्नात्मा अनिरुद्धप्रद्युम्नः । **असौ लोकः** द्युलोकः प्राणस्थितत्वसर्वाधारत्वहेतुभ्यां द्युलोकनामा द्युलोकस्थः अनिरुद्धः **सुवः इति** सुवशब्दवाच्यः संकर्षणात्मा अनिरुद्धसंकर्षणः ॥ १ ॥

**अर्थ**—[ वेदविद्येचा अभ्यास करणाऱ्यांना परमात्म्याची प्राप्ति होण्याकरितां त्या परमात्म्याचें प्रतिपादन करणारी जी व्याहृति तींत असलेली उपासना सांगतो. ] परमात्मा हा नेहमीं रहाणारा आहे म्हणून त्याला भू असें म्हणतात. परमात्मा अनंत वीर्य आहे म्हणून त्याला भुव असें म्हणतात. परमात्म्याला उत्तम बल आहे म्हणून त्याला सुव असें म्हणतात. ह्याप्रमाणें भूः, भुवः, सुवः, ह्या तीन व्याहृती परमात्म्याचें व्याहरण म्हणजे प्रतिपादन करितात, म्हणून परमात्मा व्याहृतींनें वाच्य आहे. ह्या सर्व व्याहृतींमध्यें चवथी महः अशी जी व्याहृति आहे तिचा अर्थ गुणपूर्ण परमात्मा आहे. हा अर्थ ब्रम्हदेव जाणतो. महत् असल्यामुळें महः शब्दवाच्य जो तो ब्रम्ह आहे. वासुदेव हा मध्य देह आहे. दुसऱ्या देवता म्हणजे अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण, ह्या डोकें, हात व पाय आहेत. [ भूः, भुवः, सुवः, व महः ह्या चार शब्दांनीं वाच्य जीं भगवंताचीं चार रूपें आहेत त्यांची लोक, ज्योति, वेद व प्राण ह्या चार ठिकाणीं असलेलीं नांवें सांगतो. ] जवळ राहातो व सर्वांना आधार देतो ह्या कारणांनीं जो भूलोक नांवाचा भूलोकांत राहाणारा अनिरुद्ध आहे तो भू नांवाचा अनिरुद्ध आहे. सर्वांनीं आपल्या हृदयांत असणारा परमात्मा शोधण्यास योग्य आहे ह्या कारणास्तव जो अंतरिक्ष नांवाचा अंतरिक्ष लोकांत राहाणारा अनिरुद्ध आहे तो भुव नां-

वाचा अनिरुद्धप्रद्युम्न आहे. प्राण्याच्या ठिकाणीं रहातो व सर्वांना आधार देतो ह्या कारणांनीं द्युलोक नांवाचा द्युलोकांत राहाणारा अनिरुद्ध हा सुव नांवाचा अनिरुद्धसंकर्षण आहे॥ १॥

**मह इत्यादित्यः। आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते। भूरिति वा अग्निः। भुव इति वायुः। सुवरित्यादित्यः। मह इति चन्द्रमाः। चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतीꣳषिमहीयन्ते। भूरिति वा ऋचः। भुव इति सामानि। सुवरिति यजूꣳषि॥ २॥**

**अद्वैतटीका—मह इति आदित्यः। सर्वे लोकाः आदित्येन वाव महीयंते** वर्द्धंते। **भूः इति अग्निः वै। भुवः इति वायुः। सुवः इति आदित्यः। महः इति चंद्रमाः। सर्वाणि ज्योतींषि चंद्रमसा वाव महीयंते** वर्द्धंते। **भूः इति ऋचः वै। भुवः इति सामानि। सुवः इति यजूंषि॥ २॥**

**अर्थ**—मह हा आदित्य लोक आहे. हे सर्व लोक सूर्याच्या योगानेंच वाढतात. भू ही व्याहृति अग्निदेव आहे. भुव ही वायुदेव आहे. सुव ही सूर्यदेव आहे. मह ही चंद्रदेव आहे. सर्व तेजें चंद्राच्या योगानें वाढतात. भू ही ऋग्वेद आहे. भुव ही सामवेद आहे. सुव ही यजुर्वेद आहे॥ २॥

**द्वैतटीका—आदित्यः** अदितिसुतत्वहेतुना आदित्यनामा आदित्यस्थोऽनिरुद्धः **महः इति** महशब्दवाच्यः वासुदेवात्माऽनिरुद्धवासुदेवः। तस्य महिमानमाह॥ आदित्येनेति॥ **आदित्येन** महइतिशब्दवाच्य वासुदेवात्मना स्थितेनानिरुद्धवासुदेवाख्येन **सर्वे लोकाः** पृथिव्यादिलोकत्रयस्था अनिरुद्धादयस्तिस्रो मूर्त्तयः सर्वे लोका इत्युच्यमानाः **महीयंते** पूज्यंते क्रीडया पूज्यपूजकभावेन वर्त्तंते **वाव** इति विकल्पार्थे। वस्तुतो न पूज्यपूजक इति भावः उच्चनीचत्वाभावादिति भावः। **अग्निः** अंगनेतृत्वादिनाग्निनामाग्निस्थः प्रद्युम्नः **भूः इति** भूरित्युक्तानिरुद्धात्मा प्रद्युम्नानिरुद्धः

**वै**। **वायुः** वयति बध्नाति जगदिति वायुनामा वायुस्थः प्रद्युम्नः **भुवः इति** भुवशब्दवाच्यः प्रद्युम्नात्मा प्रद्युम्नप्रद्युम्नः। **आदित्यः** आदित्यनामा आदित्यस्थः प्रद्युम्नः **सुवः इति** सुवशब्दवाच्यः संकर्षणात्मा प्रद्युम्नसंकर्षणः। **चंद्रमाः** आल्हादकत्वाचंद्रनामा चंद्रस्थः प्रद्युम्नः **महः इति** महशब्दवाच्यः वासुदेवात्मा प्रद्युम्नवासुदेवः। तस्य महिमानमाह ॥ चंद्रमसेति ॥ **चंद्रमसा** चंद्रस्थप्रद्युम्नपरमात्मना **वाव सर्वाणि ज्योतींषि** तेजांसि **महीयंते** पूज्यंते। **ऋचः** अर्चत्वहेतुना ऋक्नामा ऋक्स्थितः संकर्षणः भूः इति भूशब्दवाच्यः अनिरुद्धात्मा संकर्षणानिरुद्धः **वै**। **सामानि** समत्वहेतुना सामनामा सामस्थः संकर्षणः **भुवः इति** भुवशब्दवाच्यः प्रद्युम्नात्मा संकर्षणप्रद्युम्नः। **यजूंषि** याज्यस्वरूपतया यजुर्नामा यजुःषु स्थितः संकर्षणः **सुवः इति** सुवशब्दवाच्यः संकर्षणात्मा संकर्षणसंकर्षणः॥ २ ॥

**अर्थ**—अदितीचा पुत्र असल्या कारणानें आदित्य नांवाचा आदित्यांत राहाणारा अनिरुद्ध हा, मह नांवाचा अनिरुद्ध वासुदेव आहे. [ त्याचें माहात्म्य सांगतो. ] मह नांवाच्या अनिरुद्धवासुदेवाच्या योगानें पृथिव्यादि तीन लोकांत राहाणाऱ्या अनिरुद्धादि तीन मूर्ति सर्व लोक ह्या नांवाच्या असून पूज्यपूजक भावानें राहातात. अंगाचें नियमन करीत असल्यामुळें अग्नि नांवाचा अग्नींत राहाणारा प्रद्युम्न हा, भू नांवाचा प्रद्युम्न अनिरुद्ध आहे. जगाचें बंधन करीत असल्यामुळें वायु नांवाचा वायूंत राहाणारा प्रद्युम्न हा, भुव नांवाचा प्रद्युम्नप्रद्युम्न आहे. आदित्य नांवाचा आदित्यांत राहाणारा प्रद्युम्न हा, सुव नांवाचा संकर्षण प्रद्युम्न आहे. लोकांना आनंद देत असल्या कारणानें चंद्र नांवाचा चंद्रांत राहाणारा प्रद्युम्न हा, मह नांवाचा वासुदेव प्रद्युम्न आहे. [ त्याचें माहात्म्य सांगतो. ] चंद्रांत राहाणाऱ्या प्रद्युम्ननामक परमात्म्याच्या योगानें सर्व तेजनामक असून पूज्यपूजक भावानें राहातात. पूज्य असल्या कारणानें ऋक् नांवाचा ऋग्वेदांत राहाणारा संकर्षण हा भू नांवाचा अनिरुद्ध संकर्षण आहे. सारखे असल्या कारणानें साम नांवाचा सामवेदांत राहाणारा संकर्षण हा, भुव

नांवाचा प्रद्युम्न संकर्षण आहे. हवन करण्याला योग्य असल्या कारणानें यजु नांवाचा यजुर्वेदांत राहाणारा संकर्षण हा, सुव नांवाचा संकर्षण-संकर्षण आहे ॥ २ ॥

**मह इति ब्रम्ह । ब्रम्हणा वाव सर्वे वेदा महीयन्ते । भूरिति वै प्राणः । भुव इत्यपानः । सुवरिति व्यानः । मह इत्यन्नम् । अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते । ता वा एताश्चतस्रश्च तुर्धा । चतस्रश्चतस्रो व्याहृतयः । ता यो वेद । स वेद ब्रम्ह । सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति ॥ ३ ॥ असौ लोको यजूंषि वेद द्वे च ॥ इति पञ्चमोऽनुवाकः ॥ ५ ॥**

**अद्वैतटीका**—**मह इति ब्रम्ह** ओंकारः । **सर्वे वेदाः ब्रम्हणा वाव महीयंते । भूः इति प्राणः वै । भुवः इति अपानः । सुवः इति व्यानः । महः इति अन्नं । सर्वे प्राणाः अन्नेन वाव महीयंते । ताः एताः चतस्रः चतुर्धा** भवंति **वै** । एवं **चतस्रः चतस्रः व्याहृतयः** भवंति । **यः ताः** यथोक्तव्याहृतीः **वेद** विजानाति **सः ब्रम्ह वेद । सर्वे** अंगभूताः **देवाः अस्मै** एवं विदुषे **बलिं आवहंति** आनयंति ॥ ३ ॥ इति पंचमोऽनुवाकः ॥ ५ ॥

**अर्थ**—मह ही ब्रम्ह म्हणजे ओंकार आहे. सर्व वेद ओंकाराच्या योगानेंच पूज्य होतात. भू ही प्राण आहे. भुव ही अपान आहे. सुव ही व्यान आहे. मह ही अन्न आहे. सर्व प्राण अन्नानेंच वाढतात. ह्यापूर्वी सांगितलेल्या चार व्याहृतींपैकीं प्रत्येक चार प्रकारची होते. ह्याप्रमाणें चार व्याहृतींचे सोळा प्रकार होतात. जो कोणी ह्या व्याहृति जाणतो तो ओंकाररूप ब्रम्हाला जाणतो. सर्व देव त्या ब्रम्हज्ञान्याला बली अर्पण करितात ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें पांचवा अनुवाक संपला ॥ ५ ॥

**द्वैतटीका**—**ब्रम्ह** बृहत्वाखिलवेदाद्युक्तत्वहेतुना ब्रम्हनामा ब्रम्हशब्दिताखिलवेदसमुदायस्थः संकर्षणः **महः इति** महइत्युक्तवासुदेवात्मावासु-

देवसंकर्षणः । तस्य महिमानमाह ।। ब्रम्हणा वावेति ।। **ब्रम्हणा** ब्रम्हशब्दि-ताखिलवेदसमुदायस्थवासुदेवपरमात्मना **सर्वे वेदाः वाव** खलु **महीयंते** पूज्यंते । **प्राणः** प्रकृष्टनयनहेतुत्वात् प्राणनामा प्राणस्थो वासुदेवः **भूः इति वै** खलु भूरित्युक्तानिरुद्धात्मा वासुदेवानिरुद्धः । **अपानः** अवाक्-नयनहेतुना अपाननामा अपानस्थो वासुदेवः **भुवः इति** भुवइत्युक्तप्रद्यु-म्नात्मा वासुदेवप्रद्युम्नः । **व्यानः** विविधनयनहेतुना व्याननामा व्यानस्थितः वासुदेवः **सुवः इति** सुवरित्युक्तसंकर्षणात्मा वासुदेवसंकर्षणः । **अन्नं** सर्वोपजीव्यत्वहेतुना अन्ननामान्नस्थो वासुदेवः **महः इति** महइत्युक्तवासु-देवात्मा वासुदेववासुदेवः। तस्य महिमानमाह ।। अन्नेनेति ।। **अन्नेन** अन्न-स्थवासुदेवेन **सर्वे प्राणाः महीयंते** उपजीव्यंते । प्रागुक्तबुध्यारोहाय संगृह्योक्ता तदनुवादेन फलवत्तामाह।। ता वा एता इत्यादिना।। **ताः** भूर्भुवः सुवरिति वा इत्यत्र निर्दिष्टाः **एताः** भूरिति वा अयं लोक इत्यादिना लोक-ज्योतिर्वेदप्राणेषु प्रत्येकं चतुरात्मकस्थानेषु उक्ताः। **चतस्रः** व्याहृतयः व्या-हृतिशब्दवाच्याः मूर्तयः अनिरुद्धादयः **चतुर्धा** प्रत्येकमनिरुद्धादिभेदेन चतुर्धा भवंति **वै** खल्विति । कियंत्यो मूर्तयो जाता इत्यत आह ।। चतस्र इति ।। **व्याहृतयः** व्याहृतिशब्दवाच्याः भगवन्मूर्तयः **चतस्रः च-तस्रः** षोडश वदंति । **यः एताः** षोडशमूर्तीः **वेद सः ब्रम्ह** ब्रम्हत्वादि-गुणविशिष्टं परमात्मानं **वेद** जानाति । **अस्मै**[1] मुक्तब्रम्हणे **सर्वे** मुक्तौ स्थि-ताः **देवाः बलिं** पूजां **आवहंति**[2] आहरंति ॥ ३ ॥ इति पंचमोऽनु-वाकः ॥ ५ ॥

**अर्थ**—मोठा आहे असें सर्व वेदांत सांगितलें असल्या कारणानें ब्रम्ह नांवाचा ब्रम्ह म्हणजे सर्व वेदसमुदाय ह्यांत राहणारा संकर्षण हा, मह नांवाचा वासुदेवसंकर्षण आहे. [ त्याचें माहात्म्य सांगतो. ] सर्व वेदांत राहाणाऱ्या वासुदेव परमात्म्याच्या योगानें सर्व वेद नांवाच्या अ-निरुद्धादि मूर्ति पूज्यपूजक भावानें राहातात. उत्कृष्ट रीतीनें नेत अ-

१ तथाच सूत्रं प्रत्यक्षोपदेशादिति चेन्नाधिकारिकमंडलस्थोक्तेरिति ।
२ आङित्युपसर्गपूर्वात् वह प्रापणे इत्यस्माद्धातोर्लट् प्रथमपुरुषबहुवचनं ।

सल्या कारणानें प्राण नांवाचा प्राणांत राहाणारा वासुदेव हा, भू नांवाचा वासुदेव अनिरुद्ध आहे. खालीं नेत असल्या कारणानें अपान नांवाचा अपानांत राहाणारा वासुदेव हा, भुव नामक वासुदेव प्रद्युम्न आहे. अनेक प्रकारें नेत असल्या कारणानें व्यान नांवाचा व्यानांत राहाणारा वासुदेव हा, सुव नांवाचा वासुदेवसंकर्षण आहे. सर्वांचें पोषण करीत असल्या कारणानें अन्न नांवाचा अन्नांत राहाणारा वासुदेव हा, मह नांवाचा वासुदेववासुदेव आहे. [ त्याचें माहात्म्य सांगतों. ] अन्नांत राहाणाऱ्या वासुदेवाच्या योगानें सर्व प्राण नांवाच्या अनिरुद्धादि मूर्ति पोष्यपोषक भावानें राहातात. [ बुद्धीला समजण्याकारितां जें पूर्वी सविस्तर सांगितलें तें आतां पुनः थोडक्यांत सांगून फळ सांगतों. ] भूः, भुवः, सुवः, व महः ह्या चार व्याहृतींपैकीं प्रत्येक लोक ज्योति वेद व प्राण ह्या चार ठिकाणांपैकीं प्रत्येक ठिकाणीं आहे असें सांगितलें. चार व्याहृति नांवाच्या अनिरुद्धादिक ज्या चार मूर्ति त्यांपैकीं प्रत्येक अनिरुद्धादिक चार भेदांनीं चार प्रकारची होते. [ एकंदर मूर्ति किती होतात त्या सांगतों. ] व्याहृति नांवाच्या भगवंताच्या मूर्ति सोळा होतात. जो ह्या सोळा मूर्ति जाणतो तो परमेश्वराला जाणतो. मुक्तिकाळीं सर्व देव त्याची ( म्हणजे मुक्त झालेल्या ब्रम्हदेवाची ) पूजा करितात ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें पांचवा अनुवाक् संपला ॥ ५ ॥

**स य एषोऽन्तर्हृदय आकाशः । तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः । अमृतो हिरण्मयः । अन्तरेण तालुके । य एष स्तन इवावलम्बते । सेन्द्रयोनिः । यत्राऽसौ केशान्तो विवर्त्तते । व्यपोह्यशीर्षकपाले । भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति । भुव इति वायौ ॥ १ ॥**

**अद्वैतटीका**—ब्रम्हणः साक्षादुपलब्ध्यर्थमुपासनार्थं च हृदयाद्याका-

शस्थानमुच्यते[१] ॥ स य इति ॥ **अंतर्हृदये** हृत्पुंडरीकस्य मध्ये **यः एषः** स्वांगुष्ठपरिमितः **आकाशः** वर्त्तते **तस्मिन्** आकाशे **सः अयं मनोमयः** मनः प्रधानः **अमृतः** अमरणधर्मा **हिरण्मयः** ज्योतिर्मयः **पुरुषः** परमात्मा अस्ति। इत्थमुपास्य स्वरूपमभिधायोपासकस्य मार्गविशेषं दर्शयति ॥ अंतरेणेति ॥ **यः** योगशास्त्रप्रसिद्धः **एषः** प्रत्यक्षः **तालुके अंतरेण** तालुकयोर्मध्ये **स्तनः इव** स्वल्पः मांसखंडः **अवलंबते** लंबमानस्तिष्ठति । **यत्र केशांतः** केशानां अंतः मूलं अस्ति तत्र **असौ** सुषुम्नाख्या नाडी **विवर्त्तते** विशेषेण वर्त्तते । च मूर्द्धदेशं प्राप्य **शीर्षकपाले** शिरःकपाले **व्यपोह्य** विदार्य विनिर्गता भवति । **सा इयं इंद्रस्य** ब्रम्हणः **योनिः** मार्गः स्वरूपप्रतिपत्तिद्वारमित्यर्थः। इत्थमुपासकस्य निर्गमनद्वारमभिधायेदानीं फलं दर्शयति ॥ भूरित्यग्नाविति ॥ **भूः इति** प्रथमव्याहृत्यात्मनि **अग्नौ प्रतितिष्ठति** । तथा **भुवः इति** द्वितीयव्याहृत्यात्मनि **वायौ** प्रतितिष्ठति ॥ १ ॥

**अर्थ**—[ ब्रह्माचा साक्षात्कार होण्यास्तव व त्याची उपासना करण्यास्तव हृदयादिकांतील आकाश हें ठिकाण सांगतो. ] हृदयकमलामध्यें अंगठ्याएवढें जें आकाश आहे त्यांत मनोमय, अमर व तेजोमय असा परमात्मा आहे. [ ह्याप्रमाणें ब्रम्हाचें स्वरूप सांगून उपासना करणाऱ्याला ब्रम्हप्राप्तीचा मार्ग सांगतो. ] तोंडाच्या भोंकाच्या आंत जिभेच्या मूळाचेवर दोन टाळ्यांमध्यें थानाच्या बोंडशीसारखा लहानसा मांसाचा गोळा लोंबतो (त्यास पडजीभ असें म्हणतात. ) ज्याठिकाणीं केसांचीं मूळें लागलीं आहेत त्याठिकाणीं सुषुम्नानाडी आहे; आणि ती डोक्यापर्यंत पोंचून डोक्याच्या दोन कवच्यांना फोडून निघते. ही ब्रम्हस्वरूपाच्या प्राप्तीची वाट आहे. [ ह्याप्रमाणें उपासना करणाऱ्याला बाहेर निघण्याचा मार्ग सांगून आतां फळ काय

१ हृदयकमलमध्ये हि समाधिनानिरुद्धमेकाग्रं मनः परमात्मानं साक्षात्कर्तुं प्रभवति ।

२ कारण हृदयकमलांत समाधीच्या योगानें अवरून धरून एकाग्र केलेल्या मनाला परमात्म्याचा साक्षात्कार होतो.

आहे हें सांगतो. ] उपासना करणारा भू ह्या प्रथम व्याहृतिरूप अग्नीचे ठिकाणीं जातो. तसेंच भुव ह्या द्वितीय व्याहृतिरूप वायूचे ठिकाणीं जातो ॥ १ ॥

**द्वैतटीका**—भूरादिव्याहृतिचतुष्टयस्यानिरुद्धादेर्देहेऽपि स्थानविशेषानुपास्त्यर्थमाह ॥ स य एष इति ॥ **सः** प्रसिद्धः **यः एषः हृदये अंतः आकाशः** अस्ति **तस्मिन्** आकाशे **अयं** भूरित्युक्तः **मनोमयः** ज्ञानप्रचुरः **अमृतः** नित्यः **हिरण्मयः**[1] विलक्षणानंदप्रचुरः पुरुषः अनिरुद्धः वर्त्तते **तालुके अंतरेण** तालुकयोरंतरेण **यः एषः स्तनः इव अवलंबते सा इंद्रयोनिः**[2] इंद्रस्य परमेश्वरस्य प्रद्युम्नस्य योनिः स्थानं विधेयं। **यत्र असौ केशांतः** केशमूलं तत्र **वि** विः पूर्णरूपः संकर्षणः **वर्तते अशीर्षकपाले** कपालान्यदेशे कपालादुपरि **व्यप**[3] व्यपगतेऽपि जगति स्थाता वासुदेवः हि प्रसिद्धं वर्तते । भूरादिव्याहृतिवाच्यानामनिरुद्धादीनां उपासनार्थं स्थानांतराण्याह ॥ भूरित्यग्नाविति ॥ प्रागुक्तनिरुक्त्या **भूः इति** उक्तः अनिरुद्धः **अग्नौ प्रतितिष्ठति । भुवः इति** उक्तः प्रद्युम्नः **वायौ** प्रतितिष्ठति ॥ १ ॥

**अर्थ**—[ भूः, भुवः, सुवः, महः, ह्या व्याहृतींनीं प्रतिपादन केलेलीं जीं अनिरुद्धादिक चार रूपें आहेत त्यांचीं राहण्याचीं स्थानें उपासनेकरितां सांगतो. ] हृदयाच्या आंत जें आकाश आहे त्या आकाशामध्यें भूः ह्या शब्दानें प्रतिपादन केलेला, ज्ञानानें पूर्ण, नित्य, लोकांपेक्षां विलक्षण आनंदानें भरलेला, अनिरुद्ध परमात्मा आहे. टाळ्याच्या मध्यभागीं जेथें स्तनासारखा लोंबणारा मांसाचा भाग आहे तेथें परमैश्वर्ययुक्त प्रद्युम्न नांवाचा परमात्मा राहातो. केसांच्या मूळाशीं पूर्णरूपी

---

१ हि रुक् सुखं हिरण्यं स्यादिति स्मृतेः।

२ योनित्वापेक्षया सेति स्त्रीलिंगोक्तिः।

३ उपसर्गा हि धातुसंबंधे तदर्थबोधादिहेतवः। केवलास्तु ससाधनक्रियावाचिनो भवंतीत्यत्र टीकाकृदुक्तेः । व्यपशब्दोपपदे अस्तेः क्विपि अंतलोपे अतो गुण इति पररूपे व्यप इति रूपसिद्धिः ।

संकर्षण नांवाचा परमात्मा आहे. मस्तकाच्या कवटीच्या वरच्या भागीं, सर्व जगत नष्ट झालें तरी राहाणारा असा वासुदेव नांवाचा परमात्मा राहातो. [ भूः, भुवः, सुवः, महः, ह्यांनीं वाच्य अशा ज्या अनिरुद्धादिक चार मूर्ती आहेत त्यांचीं स्थानें उपासनेकरितां सांगतों. ] पूर्वी सांगितलेल्या रीतीनें भूः ह्या शब्दानें वाच्य अनिरुद्ध नांवाचा परमात्मा अग्नीमध्यें राहात आहे, भुवः ह्या शब्दानें वाच्य प्रद्युम्न नांवाचा परमात्मा वायूमध्यें राहात आहे ॥ १ ॥

**सुवरित्यादित्ये । मह इति ब्रम्हणि । आप्नोति स्वाराज्यम् । आप्नोति मनसस्पतिम् वाक्पतिश्चक्षुष्पतिः । श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः । एतत्ततो भवति । आकाशशरीरं ब्रम्ह । सत्यात्म प्राणारामं मन आनन्दम् । शान्तिसमृद्धममृतं । इति प्राचीनयोग्योपास्व ॥ २ ॥ वायावमृतमेकञ्च ॥ षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥**

**अद्वैतटीका**--**सुवः इति** तृतीयव्याहृत्यात्मनि **आदित्ये** प्रतितिष्ठति । **महः इति** अंगिनि चतुर्थव्याहृत्यात्मनि **ब्रम्हणि** प्रतितिष्ठति । ब्रम्हभूतः सन् **स्वाराज्यं** स्वराड्भावं **आप्नोति** स्वयमेव राजा भवति । **मनसस्पतिं आप्नोति** सर्वेषां मनसां पतिर्भवति । **वाक्पतिः** सर्वासां वाचां पतिर्भवति । **चक्षुष्पतिः** चक्षुषां पतिर्भवति । **श्रोत्रपतिः** श्रोत्राणां पतिर्भवति । **विज्ञानपतिः** विज्ञानानां पतिर्भवति । सर्वात्मकत्वात्सर्वप्राणिनां करणैस्तद्वान् भवतीत्यर्थः । **ततः** अपि अधिकतरं **एतत् भवति । आकाशशरीरं** आकाशः शरीरमस्य तत् वा आकाशवत्सूक्ष्मं शरीरमस्य तत् **सत्यात्म** सत्यः अवितथः आत्मा स्वरूपं यस्य तत् **प्राणारामं** प्राणेष्वारमणमाक्रीडा यस्य तत् **मनआनंदं** मनसः आनंदभूतं **शांतिसमृद्धं** शांतिश्च तत्समृद्धं च वा शांत्या समृद्धं **अमृतं** अमरणधर्मि **ब्रम्ह** अस्ति । **हे प्राचीनयोग्य** त्वं मनोमयत्वादिधर्मैर्विशिष्टं यथोक्तं ब्रह्म **उपास्व इति** आचार्यवचनोक्तिरादरार्था ॥ २ ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

**अर्थ**—सुव ह्या तृतीयव्याहृतिरूप आदित्याचे ठिकाणीं जातो. मह ह्या चतुर्थव्याहृतिरूप मुख्य ब्रम्हाचे ठिकाणीं जातो. ब्रम्हरूप होऊन आपणच राजा होतो. सर्व मनांचा पति होतो. सर्व वाणींचा पति होतो. चक्षूंचा पति होतो. श्रोत्रांचा पति होतो. विज्ञानांचा पति होतो. सारांश ब्रम्हज्ञानी सर्व स्वरूपीं असल्यामुळें सर्व प्राण्यांच्या इंद्रियांनीं युक्त असा होतो. त्याहून ही अधिक श्रेष्ठ होतो. हे प्राचीन योग्य, ब्रम्हाचें शरीर आकाश ( किंवा आकाशासारखें ) आहे, ब्रम्ह सत्यरूप, प्राणांच्या ठिकाणीं क्रीडा करणारें, मनाला आनंद देणारें, शांत, अमर, असें आहे. हे प्राचीनयोग्य, अशा धर्मांनीं युक्त असलेल्या ब्रम्हाची तूं उपासना कर, असें गुरूचें आदरपूर्वक म्हणणें आहे ॥ २ ॥ ह्याप्रमाणें सहावा अनुवाक संपला ॥ ६ ॥

**द्वैतटीका**—**सुवः इति** उक्तः संकर्षणः **आदित्ये** प्रतितिष्ठति । **महः इति** उक्तः वासुदेवः **ब्रम्हणि** चतुर्मुखे प्रतितिष्ठति । चतुर्मुखस्थो वासुदेवो न परिच्छिन्न इत्याह ॥ सः वासुदेवः **स्वाराज्यं आप्नोति** जगत् व्याप्य वर्तते **मनसस्पतिं** अनिरुद्धं **आप्नोति** नित्यैश्वर्यबलात्स्वव्यापी जगत्व्यापीव यतः **ततःवाक्पतिः** वाचि स्थितः वाङ्नियंता **चक्षुष्पतिः श्रोत्रपतिः विज्ञानपतिः** इति **एतत्** इत्येवंरूपो **भवति** वासुदेवस्य गुणानाह ॥ आकाशशरीरमिति ॥ ब्रम्ह वासुदेवाख्यं **ब्रम्ह आकाशशरीरं** आकाशवत् व्याप्तदेहं **सत्यात्म** गुणपूर्णं **प्राणारामं**[1] प्राणस्य वायोरासमंतात् विशेषेण रामो रामकं यस्य **मनआनंदं** ज्ञानानंदात्मकं **शांतिः** सुखोन्नतिरूपत्वाच्छांत्यात्मकं स्वतः पूर्तेः **समृद्धं अमृतं** देहतोऽपि नित्यं **इति** एवं प्रकारेण हे **प्राचीनयोग्य** प्राथमिकयोग्य चतुर्मुख **उपास्व** इति भगवान् चतुर्मुखं प्रतिप्राह ॥ २ ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

**अर्थ**—सुवः ह्या शब्दानें वाच्य संकर्षण नांवाचा परमात्मा सूर्यामध्यें राहात आहे, महः ह्या शब्दानें वाच्य वासुदेव नांवाचा परमात्मा चतुर्मुख

---

१ प्राणस्य वायोरासमंतात् विशेषेण रामो रामकं रमतेर्ण्यंतादच् प्रत्ययः ।

ब्रम्हदेवाचे ठिकाणीं राहाणारा आहे. [ चतुर्मुखामध्यें राहाणारा परमात्मा परिमित स्थानींच राहात नाहीं, तर तो व्यापक आहे हें सांगतो. ] वासुदेव नांवाचा परमात्मा सर्व जगताला व्यापून राहातो. मनाचा पति जो अनिरुद्ध त्यालाही व्यापितो. तो सर्वव्यापी आहे म्हणून वाणीचा पति, डोळ्याचा पति, कानाचा पति, उत्तम ज्ञानाचा पति, अशीं नानाप्रकारचीं रूपें घेणारा होतो. [ वासुदेव परमात्म्याचे गुण सांगतो. ] वासुदेव नामक परब्रम्हाचें शरीर आकाशाप्रमाणें व्यापक आहे. सत्य, आत्म, इत्यादि गुणांनीं पूर्ण आहे. मुख्य वायु हा त्याचें फारच आनंदाचें स्थान आहे, म्हणजे इतर सर्वांपेक्षा मुख्य प्राणाबरोबर फारच प्रेमानें वासुदेव परमात्मा असतो. त्याचें मन आनंदस्वरूपच आहे. सर्व प्रकारच्या सुखाचा पूर्ण उत्कर्ष त्याला आहे, म्हणून तो समृद्ध आहे. देह असूनही तो देह नित्य राहाणारा आहे. अशा रीतीनें साक्षात् भगवान् वासुदेव परमात्म्यानें, सर्व जीवामध्यें पहिला, योग्य अधिकारी, अशा ब्रम्हदेवाला उपदेश केला. वायूमध्येंही वासुदेव परमात्मा एकच असून नित्य आहे ॥ १ ॥ ह्या प्रमाणें सहावा अनुवाक संपला ॥ ६ ॥

**पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशः । अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणि । आप ओषधयो वनस्पतयः । आकाश आत्मा । इत्यधिभूतम् । अथाध्यात्मम् । प्राणोऽपानो व्यानउदानः समानः । चक्षुः श्रोत्रं मनो वाक्त्वक् । चर्म्म माꣳसꣳस्नावास्थि मज्जा । एतदधिविधाय ऋषिरवोचत् । पाङ्क्तं वा इदꣳसर्वम् । पाङ्क्तेनैव पाङ्क्तꣳस्पृणोतीति ॥ १ ॥ सर्वमेकञ्च । इति सप्तमोऽनुवाकः ॥७॥**

**अद्वैतटीका**—यदेतव्द्याहृत्यात्मकं ब्रम्होपास्यमुक्तं तस्यैवेदानीं पृथिव्यादिपाङ्क्तस्वरूपेणोपासनमुच्यते ॥ पृथिवीति ॥ **पृथिवी अंतरिक्षं द्यौः दिशः अवांतरदिशः** इति लोकपाङ्क्तं । **अग्निः वायुः आदित्यः**

**चंद्रमाः नक्षत्राणि** इति देवतापाङ्क्तं । **आपः ओषधयः वनस्पतयः आकाशः आत्मा** इति भूतपाङ्क्तं । **इति अधिभूतं। अथ अध्यात्मं । प्राणः अपानः व्यानः उदानः समानः** इति प्राणादिवायुपाङ्क्तं । **चक्षुः श्रोत्रं मनः वाक् त्वक्** इति चक्षुरादींद्रियपाङ्क्तं । **चर्म मांसं स्नावा अस्थि मज्जा** इति चर्मादिधातुपाङ्क्तं । इत्यध्यात्मं । **एतत्** बाह्यंपाङ्क्तं **अधिविधाय** परिकल्प्य **ऋषिः** वेदस्तद्दर्शनसंपन्नो वा कश्चित् पाङ्क्तं **वै इदं** सर्वं इति **अवोचत्** उक्तवान् । अध्यात्मिकेन **पाङ्क्तेन एव** बाह्यं **पाङ्क्तं स्पृणोति** बलयति एकात्मतयोपलभ्यतइति यावत् **इति** ॥ १ ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

**अर्थ**—[ व्याहृतिरूप ब्रम्हाची उपासना करावी असें सांगितलें. आतां पृथिव्यादि पाङ्क्त (म्हणजे पंचकडीच्या) रूपानें त्याची उपासना करण्याविषयीं सांगतों. ] पृथ्वी, आकाश, स्वर्ग, दिशा, बाकींच्या दिशा, ही लोकपंचकडी आहे. अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, नक्षत्रें, ही देवतापंचकडी आहे. उदक, ओषधी, वनस्पति, आकाश, आत्मा, ही भूतपंचकडी आहे. ह्याप्रमाणें अधिभूत आहे. आतां अध्यात्म सांगतों. प्राण, अपान, व्यान, उदान, समान, ही प्राणादि वायूची पंचकडी आहे. चक्षु, श्रोत्र, मन, वाणी, त्वचा, ही इंद्रियांची पंचकडी आहे. चर्म, मांस, स्नायु, अस्थि, मज्जा, ही धातुपंचकडी आहे. ह्याप्रमाणें अध्यात्म आहे. बाह्य पंचकडी मनांत आणून, हें सर्व पंचकडीनें युक्त आहे असें वेद किंवा वेद जाणणारा ऋषि बोलला. अध्यात्मपंचकडी व बाह्यपंचकडी ह्यांचें एक रूपानें ज्ञान होतें ॥ १ ॥ ह्याप्रमाणें सातवा अनुवाक संपला ॥ ७ ॥

**द्वैतटीका**—वेदविद्याप्राप्त्यर्थं पूर्वभाविविद्यांतरमाह ॥ पृथिवीति ॥ **पृथिवी** पृथुत्वात्तच्छब्दवाच्यः **अंतरिक्षं** अंतरीक्षणीयत्वहेतुना तच्छब्दवाच्यः **द्यौः** तच्छब्दवाच्यः **दिशः** तच्छब्दवाच्यः **अवांतरदिशः** तच्छ-

ब्दवाच्यः **अग्निः वायुः आदित्यः चंद्रमाः नक्षत्राणि** तत्तच्छब्दवाच्याः भगवन्मूर्तयः **आपः ओषधयः वनस्पतयः आकाशः आत्मा** तत्तच्छब्दवाच्याः भगवन्मूर्तयः संति **इति अधिभूतं। अथ अध्यात्मं।** देहे स्थितानि नारायणादिरूपाणामधिष्ठानान्युच्यंते ॥ प्राणोऽपानेति ॥ **प्राणः अपानः व्यानः उदानः समानः चक्षुः श्रोत्रं मनः वाक् त्वक् चर्म मांसं स्नावा अस्थि मज्जा** एतेषु स्थितानि एतन्नामकानि नारायणानिरुद्धादिनामकभगवद्रूपाणि संति । **एतत्** पृथिवीमारभ्य मज्जांतं पंचकषट्कं **अधिविधाय** अधिकृत्य आदि **ऋषिः** परमात्मा **इदं सर्वं** पृथिव्यादिवर्गषट्कं **पांक्तं** पंचत्वसंख्यायुक्तं **वै** खलु **पांक्तेन एव** पंचत्वसंख्यायुक्तेन नारायणादिरूपेण **पांक्तं** पंचत्वसंख्यायुक्तं पृथिव्यादिकं **स्पृणोति**[१] स्वस्वव्यापारशक्तं करोति **इति** अवोचत ॥ १ ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

**अर्थ**—[वेदविद्या प्राप्तीकरितां प्रथमतः असलेली एक विद्या सांगतो.] पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग, पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, ह्या दिशा आग्नेय, वायव्य, नैर्ऋत्य, ईशान्य, ह्या अवांतर दिशा, ह्या प्रत्येकामध्ये अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण, वासुदेव हीं भगवंताचीं रूपें आहेत, व तीं रूपें त्या त्या नांवानें वाच्य आहेत. अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, व नक्षत्रें ह्यांमध्येंही अनिरुद्धादिक भगवंताचीं रूपें आहेत, व तीं त्या त्या शब्दांनीं प्रतिपादन केलेलीं आहेत. उदक, ओषधि, वनस्पति, आकाश व आत्मा ह्यांमध्येंही पूर्वीप्रमाणेंच परमात्म्याचीं अनिरुद्धादि रूपें आहेत, व तीं त्या त्या शब्दांनीं वाच्य आहेत. ह्याप्रमाणें भूतमात्रामध्यें राहाणाऱ्या परमात्म्याचीं स्वरूपें सांगितलीं. [ देहामध्यें असलेलीं नारायणादि रूपांचीं स्थानें सांगतो. ] प्राण, अपान, व्यान, उदान, समान, ह्या पांच प्राणांमध्यें नारायणादिक भगवंताचीं रूपें आहेत. डोळे, कान, मन, वाणी, त्वचा, हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ह्यांमध्यें भगवंताचीं नारायणादि रूपें

१ स्पृप्रीतिपालनयोरित्युक्तेः बलयति स्वस्वव्यापारशक्तं करोतीत्यवोचदिति योजना।

आहेत. कांतडी, मांस, स्नायु, अस्थि, मज्जा, ह्या पांचांमध्येंही नारायणादिक रूपें आहेत. पृथिवीपासून मज्जेपर्यंत एकंदर साहा पंचकें आहेत, म्हणजे तीस पदार्थ आहेत. त्यांमध्यें नारायणादिक भगवंताचीं रूपें आहेत. परमात्म्यानेंही सर्व उद्देशून असा उपदेश केला कीं, ही पृथिवी इत्यादि एक पंचकडी आहे, अग्नि इत्यादि एक पंचकडी आहे, आप इत्यादि एक पंचकडी आहे, प्राणादि एक पंचकडी आहे, डोळे इत्यादि एक पंचकडी आहे, कांतडी इत्यादि एक पंचकडी आहे, अशा ह्या साहा पंचकड्या आहेत; ह्या साही पंचकड्यांनीं आपआपल्या जागीं स्थापन करणारा परमात्मा आहे ॥१॥ ह्याप्रमाणें सातवा अनुवाक संपला ॥७॥

**ओमिति ब्रम्ह। ओमितीदꣳसर्वम्। ओमित्येतदनुकृतिर्ह स्म वा अप्योश्रावयेत्याश्रावयन्ति। ओमिति सामानि गायन्ति। ओꣳशोमितिशस्त्राणि शꣳसन्ति ओमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति। ओमिति ब्रम्हा प्रसौति। ओमित्यग्निहोत्रमनुजानाति। ओमिति ब्राम्हणः प्रवक्ष्यन्नाह ब्रम्होपाप्नुवानीति। ब्रम्हैवोपाप्नोति ॥ १ ॥ ॐ दश ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥**

**अद्वैतटीका**—व्याहृत्यात्मनो ब्रम्हण उपासनमुक्तं। अनंतरंच पाङ्क्तस्वरूपेण तस्यैवोपासनमुक्तं। इदानीं सर्वोपासनांगभूतस्योंकारस्योपासनं विधित्स्यते॥ ओमितिब्रम्हेति॥ **ओं इति**[1] ओमित्येतच्छब्दरूपं **ब्रम्ह** इति मनसा धारयेत्। **ओं इति इदं सर्वं** यतः सर्वं शब्दरूपमोंकारेण व्याप्तं। **ओं इति एतत् अनुकृतिः** करोमि यास्यामि वेति अनुकरणं अस्ति **ह स्म वै। अपि** च वेदविदः **ओश्रावय इति** तत्पूर्वकं **आश्रावयंति** प्रतिश्रावयंति। तथा **ओं इति** सामगाः **सामानि गायंति। ओं शों इति** शस्त्रशंसितारः **शस्त्राणि शंसंति**। तथा **ओं इति अध्वर्युः**

१ इतिशब्दः स्वरूपपरिच्छेदार्थः।

**प्रतिगरं** वाङ्मनः कायसंबद्धमात्रं कर्म प्रतिगरः तं **प्रतिगृणाति** करोति। **ओं इति ब्रम्हा प्रसौति** जानाति। **ओं इति अग्निहोत्रं अनुजानाति। प्रवक्ष्यन्** प्रवचनं करिष्यन् **ब्राम्हणः ओं इति आह।** अहं **ब्रह्म उपाप्नवानि इति** यः उपासीत सः **ब्रम्ह एव आप्नोति।** यस्मादोंकारपूर्वं प्रवृत्तानां क्रियाणां फलत्वमस्ति तस्मादोंकारं ब्रम्होपासीतेतिवाक्यार्थः ॥ १ ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

**अर्थ**—[ व्याहृतिरूप ब्रम्हाची उपासना सांगितली. नंतर पंचकडीच्या रूपानें ब्रम्हाची उपासना करण्याचें सांगितलें. आतां जी सर्व उपासनांना अंगभूत आहे अशी ओंकाराची उपासना सांगतो. ] ओं हें शब्दरूप ब्रम्ह आहे अशी मनानें उपासना करावी. शब्दरूप जें आहे तें सर्व ओंकारानें व्याप्त आहे, म्हणून हें सर्व ओंकाररूप आहे. मी करतो, किंवा मी जातो असें जें अनुकरण तें ओंकाररूप आहे. आणखी वेद जाणणारे ओश्रावय (म्हणजे अरे ऐकीव) असें म्हणून ऐकवितात. तसेंच, सामवेद गाणारे ओं असें म्हणून सामवेद गातात. यज्ञांत शस्त्र म्हणणारे ओं शों असें म्हणून शस्त्रें म्हणतात. तसेंच, अध्वर्यु ओंकार म्हणून वाणी, मन व शरीर ह्यांनीं करावयाचीं कर्में करितो. ओं असें म्हणून ब्रम्हदेव जें जाणावयाचें तें जाणतो. ओं असें म्हणून अग्निहोत्री होम करितो. ज्याला अध्ययन करावयाचें आहे तो ब्राम्हण ओं असें म्हणून अध्ययनास आरंभ करितो. मला ब्रम्ह प्राप्त व्हावें अशी जो उपासना करितो त्याला ब्रम्हच प्राप्त होतें. तात्पर्य, ओंकाराचा उच्चार करून जें कर्म करावें तें सफळ होतें, म्हणून ओंकाररूप ब्रम्हाची उपासना करावी ॥ १ ॥ ह्याप्रमाणें आठवा अनुवाक संपला ॥ ८ ॥

**द्वैतटीका**—वेदविद्याभ्यासार्थिनः पूर्वभाविनीं प्रणवविद्यामाह ॥ ॐ मिति ॥ **ॐ इति ब्रम्ह** परमात्मा **ॐ** परमात्मा **इति इदं सर्वं** मत्स्यादिरूपं वा कुतः परमात्मनेओमितिनामत्वं ज्ञायतइत्यतः परमात्मानमु-

१ तथाच सूत्रं नस्थानतोऽपि परस्योभयलिंगं सर्वत्रहीति ।

दिश्य कर्माणि कुर्वद्भिर्नियमेन तदोमित्युच्चार्यमागत्वादितिभावेनाह ॥ **ॐ इति एतत् अनुकृतिः** इति अनुकरणरूपं प्रसिद्धं **ह स्म वै** खलु अधिकोच्चहोतृभ्यपरमात्मनः **ॐ श्रावय इति** होतारः **आश्रावयंति ।** यदि हरिरोंनाम न स्यात्तदाध्वर्युस्तदा न कुर्यात् **ॐ इति** उच्चार्य उद्गातारः **सामानि गायंति** तदपि ॐ मिति परमात्मानमुद्दिश्य गायंति । ॐ इति शं सुखरूपत्वात् **शमिति ॐ शस्त्राणि शंसंति** स्तुवंति । **अध्वर्युः ॐ इति प्रतिगरं** प्रतिमंत्रं **प्रतिगृणाति ब्रम्हा ॐ इति** परमात्मानमुद्दिश्य **प्रसौति** सोममभिषुणोति । **ॐ इति अग्निहोत्रं** अग्निहोत्रादिककर्मसांगं सफलं परमात्माकरोत्विति **अनुजानाति ।** ब्राम्हणः **ब्रह्म उपाप्नुवानि** इति भावेन **ॐ इति प्रवक्ष्यन् । इह ब्रम्ह एव उपाप्नुवानि इति ब्राम्हणाः** प्रवक्ष्यंति ॥ १ ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

**अर्थ**—[वेदविद्येचा अभ्यास करणाऱ्यास प्रथमतः प्रणव विद्या सांगतो.] ॐ या शब्दानें वाच्य परमात्मा आहे, कारण तो गुणपूर्ण आहे; व ओं याचा अर्थ गुणपूर्ण आहे; व तसेंच मच्छादि रूपें ॐ शब्दानें वाच्य आहेत. आतां परमात्मा ॐ शब्दानें प्रतिपादित आहे हें कशावरून तें सांगण्याकरितां ॐ असा शब्द बोलून परत्म्याच्या उद्देशानें सर्व कर्में त्याला अर्पण करितात अशा भावानें सांगतो. ] हा ओंकार मुख्यत्वेंकरून परमात्म्यालाच प्रतिपादन करणारा आहे. त्या ओंकाराचे उच्चार करूनच कर्में इत्यादिक परमात्म्याला अर्पण करितात हें प्रसिद्ध आहे. तसेंच यज्ञामध्यें याज्ञिकलोक मंत्र बोलतांना व परमात्म्याची स्तुति करतांना सुद्धां परमात्म्याच्या संतोषाकरितां ओं असें उच्चारण करतात. यावरूनही ओं हा शब्द परमात्म्याचा वाचक आहे. जर ओं शब्द परमात्म्याचा वाचक नसेल तर याज्ञिक लोक ओं शब्दाचा उच्चार करून कर्में करतेचना. ओं याचें अनुकरण करून याज्ञिक मंत्र बोलतात. सामवेद म्हणणारे याज्ञिक सुद्धां ओं असें उच्चारूनच परमात्म्याची स्तुति मंत्रानें करतात. परमात्मा सुखरूपी आहे, म्हणून शं असें बोलून सर्व शास्त्रें परमात्म्याची स्तुति करतात. यजुर्वेद म्हणणारे याज्ञिक परमात्म्याची स्तुति करतांना

प्रत्येक मंत्रीं ओं असा शब्द बोलतात. ब्रम्हदेव सुद्धां सोमयज्ञ करतांना त्यामध्यें स्तुतीचे मंत्र बोलतांना ओं असा शब्द बोलतो. अग्निहोत्रादिक कर्मे करून तीं सफल होण्याकरितां परमात्म्याची प्रार्थना करतांना सुद्धां ओं असें बोलतात. ब्राम्हण लोक सुद्धां मला परब्रम्हाची प्राप्ति होवो अशा अभिप्रायानें ओं असा शब्द बोलतात. पूर्वी बोलले व पुढें बोलतील याप्रमाणें दहा दहा प्रकार सांगितले त्यामध्यें ओं हा शब्द असलाच पाहिजे. या वरूनही ओं हा शब्द मुख्यत्वेंकरून परमात्म्याचा वाचक आहे व त्याच्याच संबंधानें दुसरीकडे ह्मणजे कर्मादिकामध्यें योजिला आहे तरी सुद्धां जीं कर्मे परमात्म्याच्या निमित्तानें त्याच्या प्रीतीकरितां आहेत त्याच कर्मांमध्यें ओं याची योजना केली आहे ॥ १ ॥ ह्याप्रमाणें आठवा अनुवाक संपला ॥ ८ ॥

**ऋतञ्च स्वाध्यायप्रवचने च। सत्यञ्च स्वाध्यायप्रवचने च। तपश्च स्वाध्यायप्रवचने च। दमश्च स्वाध्यायप्रवचने च। शमश्च स्वाध्यायप्रवचने च। अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च। अग्निहोत्रञ्च स्वाध्यायप्रवचने च। अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च। मानुषञ्च स्वाध्यायप्रवचने च। प्रजा च स्वाध्यायप्रवचने च। प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च। प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च। सत्यमिति सत्यवचा राथीतरः। तपइति तपो नित्यः पौरुशिष्टिः। स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः। तद्धि तपस्तद्धि तपः ॥१॥ प्रजा च स्वाध्यायप्रवचने च षट् च ॥ इति नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥**

**अद्वैतटीका**–विज्ञानादेवाप्नोति स्वाराज्यमित्युक्तत्वाच्छ्रौतस्मार्तानां कर्मणामानर्थक्यं प्राप्तमित्यतस्तन्मा प्रापदिति कर्मणां पुरुषार्थं प्रति साधनप्रदर्शनार्थमिहोपन्यासः ॥ ऋतमिति ॥ **ऋतं स्वाध्यायप्रवचने च** स्वाध्या-

योऽध्ययनं प्रवचनं ब्रह्मयज्ञः **च। सत्यं** सत्यप्रवचनं **च स्वाध्यायप्रवचने च। तपः** कृच्छ्रादि **च स्वाध्यायप्रवचने च। दमः** बाह्यकरणोपशमः **च स्वाध्यायप्रवचने च। शमः** अंतरिंद्रियनिग्रहः **च स्वाध्यायप्रवचने च। अग्नयः च स्वाध्यायप्रवचने च। अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च। अतिथयः च स्वाध्यायप्रवचने च। मानुषं** लौकिकः व्यवहारः **च स्वाध्यायप्रवचने च। प्रजा च स्वाध्यायप्रवचने च। प्रजनः** प्रजननमृतौभार्यागमनं **च स्वाध्यायप्रवचने च। प्रजातिः** पौत्रोत्पत्तिः **च स्वाध्यायप्रवचने[1] च।** एतान्यृतादीनि अनुष्ठेयानि। स्वाध्यायाधीनं ह्यर्थज्ञानं। अर्थज्ञानायत्तं च परं श्रेयः। प्रवचनं च तदविस्मरणार्थं धर्मवृध्दयर्थं च। अतः स्वाध्यायप्रवचनयोरादरः कार्यः। **सत्यवचाः** सत्यमेव वचो यस्य सोऽयं वा सत्यवचानामा **राथीतरः** रथीतरस्य गोत्रो राथीतराचार्यः **सत्यं इति** सत्यमेवानुष्ठातव्यमिति मन्यते। **तपोनित्यः** तपः परः वा तपोनित्यनामा **पौरुशिष्टिः** पुरुशिष्टस्यापत्यं पौरुशिष्टिराचार्यः **तपः इति** तप एव कर्त्तव्य मिति मन्यते। **मौद्गल्यः** मुद्गलस्यापत्यं मौद्गल्य आचार्यः **नाकः** नामतः **स्वाध्यायप्रवचने[2]** एवानुष्ठेये **इति** मन्यते। **हि** यस्मात् **तत्** स्वाध्यायप्रवचनमेव **तपः** तस्मात्तदनुष्ठेयं। **हि तत्** तपः॥ १॥ **इति** नवमोऽनुवाकः ॥ ९॥

**अर्थ**— [ विज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो असें सांगितल्यामुळें श्रौतस्मार्त कर्म व्यर्थ होतें, तसें न होण्यास्तव आणि कर्म हेंही मोक्षाचें साधन आहे असें दाखविण्यास्तव पुढील ग्रंथ लिहिला आहे. ] शास्त्रप्रमाणें वागणें व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रह्मयज्ञ, कृच्छ्र इत्यादि तपें व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, बाह्येंद्रियाचा निग्रह व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, अंतरिंद्रियांचा निग्रह व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, अग्न्याधान व वेदाचें अ-

१ सर्वैः कर्मभिर्युक्तस्यापि स्वाध्यायप्रवचने यत्नतोऽनुष्ठेये इत्येवमर्थं सर्वेण सह स्वाध्यायप्रवचनग्रहणं।

२ उक्तानामपि सत्यतपःस्वाध्यायप्रवचनानां पुनर्ग्रहणमादरार्थं।

ध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, अग्निहोत्र व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, अतिथिपूजा व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, लौकिकव्यवहार व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, संतति उत्पन्न करणें व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, ऋतुकालीं बायकोशीं गमन करणें व वेदाचें अध्ययन करणें आणि ब्रम्हयज्ञ, पुत्राकडून नातु उत्पन्न करविणें व वेदाचें अध्यन करणें आणि ब्रम्हयज्ञ, हीं कर्मे करावींत. अध्ययन करण्यानें अर्थज्ञान होतें, अर्थाच्या ज्ञानानें मोक्ष मिळतो, वरचेवर आवृत्ति करण्यानें अध्ययन केलेला विषय विसरत नाहीं व धर्म वाढतो, ह्या कारणास्तव अध्ययन करावें व वरचेवर आवृत्ति करावी. सत्य भाषण करणारा ( अथवा सत्यवचा नांवाचा ) रथीतर गोत्रांत जन्मलेला राथीतर नामक ऋषि सत्यपणानें चालावें असें म्हणतो. तपोनिष्ठ [ अथवा तपोनित्य नांवाचा ] पुरुशिष्टाचा मुलगा पौरुशिष्टि नांवाचा ऋषि तपच करावें असें म्हणतो. मुद्गलाचा मुलगा नाक नांवाचा ऋषि वेदाध्ययन व त्याची आवृत्ति करावी असें म्हणतो. वेदाध्ययन व त्याची आवृत्ति करणें हेंच तप असल्याकारणानें त्यांचें अनुष्ठान करावें ॥ १ ॥ ह्याप्रमाणें नववा अनुवाक संपला ॥ ९ ॥

**द्वैतटीका**—वेदाख्यब्रम्हविद्याकामस्य तत्प्राप्त्यर्थं तत्पूर्वभाविनो यमनियमानाह॥ ऋतं चेत्यादिना ॥ **ऋतं** यथार्थज्ञानं **च स्वाध्यायप्रवचने च** गुरूच्चारणानुच्चारणं प्रवचनं व्याख्याने अवश्ये कर्तव्ये। **सत्यं च** यथार्थज्ञानपूर्वकं तत्प्रवचनं तत्पूर्वकं करणं वेति च **स्वाध्यायप्रवचने च** गुरूच्चारणानुच्चारणव्याख्याने अवश्ये कर्तव्ये। **तपः च** ध्यानं सत्यं पूज्यपूजा च **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये। **दमः च** इंद्रियनिग्रहः **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये। **शमः** भगवन्निष्ठता **च स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये। **अग्नयः च** अग्नीनामाधानं **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये। **अग्निहोत्रं** अग्निहोत्रानुष्ठानं **च स्वाध्यायप्रवचने** कर्तव्ये। **अतिथयः च** अतिथीनां पूजनं च **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये। **मानुषं च** मनुष्यस्येदं देवादेरुत्तमस्य

मनुष्यत्वे प्राप्ते ज्ञानाद्यतिशये सत्यपि तदप्रकाशेन मनुष्यसंबंधिधर्मप्रदर्शनं **च स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये । **प्रजाः च** सुतोत्पत्तिः **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये **प्रजननः च** तद्रक्षणं **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये । **प्रजातिः** पित्रापुत्रस्य द्विजत्वसंस्कारणप्रकृष्टजातिकरणं **स्वाध्यायप्रवचने च** कर्तव्ये सर्वकर्मकृतिकालेष्वपि स्वाध्यायप्रवचनयोः कर्तृत्वज्ञापनाय तयोः सर्वत्रानुषंगः । सत्यादीनां श्रेयः साधनत्वं सममुत एकस्याधिकमित्यपेक्षायां मुनिमतोक्तिपूर्वकं कस्यचित्तदाह ॥ सत्यमित्यादिना ॥ **सत्यवचः** सत्यं वचो यस्य सः सत्यभाषणः **राथीतरः** राथीतरो नाममुनिः **सत्यं** यथार्थज्ञानपूर्वकं वचनं करणं वा श्रेयः इति आह । **तपः** ध्यानादिरूपं तपः श्रेयः इति **पौरुशिष्टिः** तन्नामा मुनिः आह । **नाकः** नाको नाम **मौद्गल्यः** मुद्गलपुत्रः मुनिः स्वाध्यायप्रवचने एव श्रेयसी इति आह । तत्राद्ययोः समत्वेऽपि तृतीयं मतमतिशयितमित्याह ॥ तद्धि तप इति ॥ **तत् हि तपः। तत् हि तपः** ध्यानरूपं श्रेष्ठं । ऋतादेः सर्वस्यानयोरंतर्भावादेतयोरनुष्ठाने सर्वं तेन कृतं भवत्येवेति भावः ॥ १ ॥ इति नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

**अर्थ**—[ वेद हा परब्रम्हाची विद्या शिकणाऱ्यांस पूर्वी लागणारे अवश्य नियम सांगतो. ] सत्यज्ञान व गुरूपासून शिकणें व विद्यार्थ्यांना शिकविणें हें अवश्यक आहे. सत्यज्ञानपूर्वक बोलणें व त्याप्रमाणें क्रिया करणें, गुरूपासून शिकणें, व शिष्यांना शिकविणें, हें अवश्यक आहे. सत्य बोलणें, परम योग्यांची पूजा करणें, गुरूपासून ज्ञान मिळविणें, व शिष्यांना ज्ञानाचा उपदेश करणें, हें अवश्यक आहे. ह्याप्रमाणें इंद्रियांचे निग्रह करणें, भगवंतावर निष्ठा धरून असणें, अग्नीचें आधान करणें, अग्निहोत्राचें अनुष्ठान करणें, अतिथींची पूजा करणें, कांहीं शापादिकांच्या योगानें मनुष्ययोनीस आलेल्या देवादिकांनीं पुष्कळ ज्ञान असूनही तें प्रकट न करितां गुरूपासून शिकणें व विद्यार्थ्यांना शिकविणें, पुत्र उत्पन्न करणें, पुत्रांचें रक्षण करणें, बापानें पुत्राचें उपनयन करून त्याला ब्राम्हणपणास आणणें, ह्यांपैकीं प्रत्येक कर्म करणें, व प्रत्येक कर्म

करते वेळीं गुरूपासून शिकणें व शिष्यांना शिकविणें हें अवश्यक आहे, कारण ज्ञान मिळविणें अतिशय अवश्यक आहे. [ खरें ज्ञान असणें, खऱ्या रीतीनें वागणें इत्यादिकांमध्यें सर्व साधनें सारखींच आहेत किंवा एकादें श्रेष्ठ आहे हें सांगतों. ] सत्य भाषण करणारा राथीतर नांवाचा मुनि सत्य म्हणजे खरें ज्ञान असून त्याप्रमाणें बोलणें व करणें हेंच मोक्षाचें मुख्य साधन आहे असें सांगतो. पौरुशिष्टि नांवाचा मुनि हा ध्यान करणें हेंच मुख्य स्थान आहे असें सांगतो. मुद्गलाचा पुत्र नाक नांवाचा ऋषि अध्ययन करणें व विद्यार्थ्यांना पढविणें हींच मुख्य साधनें आहेत असें सांगतो. [ त्यांमध्यें पहिलीं दोन सारखीं आहेत, तथापि तिसरें तप हें फारच अधिक आहे असें सांगतो. ] ध्यान रूप तप हें श्रेष्ठ आहे. ध्यान रूप तप श्रेष्ठ आहे. खरें ज्ञान असणें, खऱ्या रीतीनें वागणें इत्यादि ह्यांचा अंतर्भाव आपण शिकणें व दुसऱ्यांना पढविणें ह्यांत होत असल्याकारणानें हें केलें असतां सर्व केलें असें होतें असा अभिप्राय समजावा ॥ १ ॥ ह्याप्रमाणें नववा अनुवाक संपला ॥ ९ ॥

**अहं वृक्षस्य रेरिवा कीर्तिः पृष्ठं गिरेरिव । ऊर्ध्व पवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि । द्रविणꣳसुवर्चसम् । सुमेधा अमृतोक्षितः इति त्रिशङ्कोर्वेदानुवचनम् ॥ १ ॥ अहꣳ षट् ॥ इति दशमोऽनुवाकः ॥ १० ॥**

**अद्वैतटीका**—ब्रम्हयज्ञासमर्थस्य जप्यं मंत्रं दर्शयति ॥ अहं वृक्षस्येति ॥ **अहं वृक्षस्य** संसारवृक्षस्य **रेरिवा** अंतर्याम्यात्मना प्रेरयिता । मम **कीर्तिः गिरेः पृष्ठं इव** उत्थिता भवतु । **उर्ध्वपवित्रः** अहं **वाजिनि इव स्वमृतं** शोभनं विशुद्धमात्मतत्वं **अस्मि** भवामि । **सुवर्चसं** दीप्तिम देवात्मतत्वं **द्रविणं** धनं अस्मि । अहं **सुमेधाः** शोभना मेधा यस्य सः **अमृतः** अमरणधर्मा **अक्षितः** अव्ययः ( यद्वा अमृतेन उक्षितः सिक्तः ) अस्मि । **इति त्रिशंकोः** ऋषेर्ब्रम्हभूतस्य **वेदानुवचनं** वेदो वेदनमात्मैक-

त्वविज्ञानं तस्य प्राप्तिकरमनुवचनं वेदानुवचनं ॥ १ ॥ इति दशमोऽनुवाकः ॥ १० ॥

**अर्थ**--[ ज्यास ब्रम्हयज्ञ करण्याचें सामर्थ्य नाहीं त्यानें जप करण्याचा मंत्र सांगतों. ] मी संसाररूप वृक्षाच्या अंतर्यामी राहून प्रेरणा करणारा आहें. माझी कीर्ति पर्वताच्या शिखराप्रमाणें वाढो. ज्याला ब्रह्म पवित्र करितें असा मी सूर्याचे ठिकाणीं असलेल्या अमृताप्रमाणें आहें. मी तेजःपुंज आत्मतत्वरूपी धन आहें. मी चांगल्या बुद्धीचा आहें. मी अमर व अविनाशी आहें ( अथवा मी अमृत म्हणजे गुरूच्या कृपादृष्टीनें युक्त आहें ) . ब्रम्हनिष्ठ असलेल्या त्रिशंकु नामक ऋषींचें आत्मज्ञान प्राप्त करून देण्याविषयीं असें वचन आहे ॥ १ ॥ ह्याप्रमाणें दाहावा अनुवाक संपला ॥ १० ॥

**द्वैतटीका**--स्वाध्यायप्रवचनयोराधिक्यमित्युक्तेऽर्थे आख्यायिकामाह ॥ अहमिति ॥ **अहं वृक्षस्य** संसारवृक्षस्य **रेरिवा** छेत्ता । **गिरेः पृष्ठं इव** पर्वताऽधोभागवत् **कीर्तिः** स्वाध्यायप्रवचनजन्ययशोलक्षणा दिगंतविस्तीर्णा । संसारनिवर्त्तनादिकं न स्वसामर्थ्यात् किंतु ईश्वरप्रसादेनेति भावेनाह ॥ ऊर्ध्वेति ॥ **ऊर्ध्वपवित्रः** ऊर्ध्वेन अत्युत्कृष्टेन हरिणा पवित्रः पावितः **अस्मि** । तदनंतरं प्रारब्धकर्मणो भोगेन क्षये चरमदेहपातानंतरं अर्चिरादिद्वारेण सूर्यलोकं प्राप्य तत्र **वाजिनीवस्वमृतं** वाजिनं नयतीति वाजिनीः सूर्यस्तत्र वसतीति वाजिनीवसु तेन हरिणा अमृतं पापप्रारब्धकर्मशेषनिर्मुक्तश्च **अस्मि । सुवर्चसं** शोभनकांतियुक्तं **द्रविणं** सुवर्णमिव जातोऽस्मि नित्यानंदस्वरूपत्वादितिभावः । **सुमेधाः** सुबुद्धिमान् **अमृतोक्षितः** अमृतेन हरिणा उक्षितः व्याप्तोऽस्मि । **इति** इत्येवं **त्रिशंकोः** वैवस्वतमनुवंशोत्पन्नस्य तन्नाम्नो राज्ञः **वेदानुवचनं** वेदव्याख्यानफलमस्ति ॥ १ ॥ इतिदशमोऽनुवाकः ॥ १० ॥

---

२. रछेदन इत्यतो लिटः कसुरिति कसावादेशे द्विर्वचने यत्वाभ्यासलोपयोः स्वाद्युत्पत्तावित्वान्नुमि अत्वसंतस्यचेतिदीर्घे रेरिवेति सिद्धेः ।

**अर्थ**—[ आपण शिकणें व दुसऱ्यांना शिकविणें ह्यांना श्रेष्ठपणा आहे ह्याविषयीं एक गोष्ट सांगतों. ] मी संसाररूप वृक्षाचा नाश करणारा आहें. जसे डोंगर पसरलेले आहेत, तशी अध्ययन व अध्यापन ह्यांपासून मिळालेली माझी कीर्ति सर्व ठिकाणीं पसरलेली आहे. [ आपल्या सामर्थ्यानें संसाराचें निवारण इत्यादि घडत नाहीं, तर परमेश्वराच्या कृपेनेंच घडतात असें सांगतो. ] परमेश्वरानें मजला पवित्र केलें आहे, म्हणून सूर्यांत राहाणाऱ्या परमेश्वराच्या योगानें मी अप्रारब्ध पाप रहित झालों आहें. मग प्रारब्धकर्मांचा उपभोग घेऊन त्यांचा नाश झाल्यावर शेवटचा देह पडल्यानंतर अर्चिरादिमार्गानें सूर्यलोकाला जाऊन तेथें सूर्यांत राहाणाऱ्या परमात्म्याच्या योगानें मी बाकी राहिलेल्या प्रारब्धकर्मापासून मुक्त झालों आहें. मी सुंदर कांतीनें युक्त सोन्याप्रमाणें झालों आहें, कारण माझें स्वरूप नित्यानंद आहे. मीं चांगला बुद्धिवान् होऊन हरीच्याजवळ आहें. ह्याप्रमाणें वैवस्वत मनूच्या वंशांतील त्रिशंकु नांवाच्या राजानें वेदव्याख्यानाचें फळ सांगितलें आहे ॥ १॥ ह्याप्रमाणें दाहावा अनुवाक संपला. ॥ १० ॥

**वेदमनूच्याचार्य्योऽन्तेवासिनमनुशास्ति । सत्यं वद । धर्म्मञ्चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्य्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यं । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥ १ ॥**

**अद्वैतटीका**—केवलकर्मणामपि विविदिषोत्पादनद्वारेण मोक्षहेतुत्वमभिप्रेत्य तदनुशासनं विधत्ते ॥ वेदमनूच्येति ॥ **आचार्यः वेदं अनूच्य** अध्याप्य **अंतेवासिनं** शिष्यं वक्ष्यमाणप्रकारेण **अनुशास्ति** ग्रंथग्रहणादनुपश्चाच्छास्ति तदर्थं ग्राहयति । हे शिष्य त्वं **सत्यं** यथा प्रमाणावगतं वक्तव्यं **वद । धर्मं चर । स्वाध्यायात्** अध्ययनात् **मा प्रमदः** प्रमादं माकार्षीः । **आचार्याय** आचार्यार्थं **प्रियं** इष्टं **धनं आहृत्य** आनीय दत्वा

च दारादिकं दत्वा **प्रजातंतुं** संतानं **मा व्यवच्छेत्सीः** प्रजासंततेर्वि-च्छित्तिर्न कर्तव्येत्यर्थः। त्वया **सत्यात् न प्रमदितव्यं** प्रमादो न कर्तव्यः। **धर्मात् न प्रमदितव्यं** तस्याननुष्ठानं न कर्तव्यं। **कुशलात्** आत्मरक्षार्थात्कर्मणः **न प्रमदितव्यं। भूत्यै** विभूत्यै मंगलकर्मणः **न प्रमदितव्यं। स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यं** ते हि नियमेन कर्तव्ये इत्यर्थः॥ १॥

**अर्थ**—[ नुस्तीं कर्में ज्ञानाची इच्छा उत्पन्न करून मोक्ष मिळण्याला कारण होतात असें मनांत आणून कर्में करण्यास सांगतो. ] गुरु शि-ष्याला वेद शिकवून पुढें सांगितल्याप्रमाणें त्याला वेदाचा अर्थ सांगतो. तो असा कीं, सप्रमाण असेल तें बोल. धर्मप्रमाणें वाग. अध्ययन कर-ण्याविषयीं बेसावध राहूं नकोस. गुरूला जें आवडेल तें धन इत्यादि देऊन आपल्या संततीचें खंडन करूं नकोस. तूं सत्यपणानें वागण्या-विषयीं बेसावध होऊं नकोस. धर्मानें वागण्याला आळस करूं नकोस. आपलें रक्षण करणारें कर्म करण्यास बेसावध होऊं नकोस. कल्याणदायक कर्म करण्याविषयीं बेसावध राहूं नकोस. अध्ययन व आवृत्ति हीं नियमानें करण्याविषयीं बेसावध राहूं नकोस॥ १॥

**द्वैतटीका**—वेदश्रवणानंतरं भाविनोयमनियमानाह॥ वेदमनूच्येत्यादि॥ **वेदं अनूच्य** व्याख्याय **आचार्यः** गुरुः **अंतेवासिनं** शिष्यं **अनुशास्ति** शिक्षयति। अनुशासनप्रकारमाह॥ सत्यं वदेत्यादि॥ **सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायात् मा प्रमदः** प्रमादं माकार्षीः स्वाध्यायं मा विस्मार्षीः। **आचार्याय** इष्टं **धनं आहृत्य** आनीय गुरुदक्षिणां दत्वा तदनुज्ञातोऽनुरूपदारानुद्वाह्य **प्रजातंतुं मा व्यवछेत्सीः** प्रजासंततेरविच्छित्तिः कार्या। **सत्यात् न प्रमदितव्यं** सत्यं मा त्यज। **धर्मात् न प्रमदितव्यं** धर्मं न त्यज। **कुशलात्** श्रेयोहेतुव्यापारात् **न प्रमदितव्यं। भूत्यै** न्यायेन द्रव्योपार्जनार्थं **न प्रमादितव्यं। स्वाध्याय प्रवचनाभ्यां न प्रमदितव्यं**॥ १॥

**अर्थ**—[ वेदाचें श्रवण केल्यावर पुढें करावयाचे यम व नियम सांगतो. ] गुरु शिष्याला वेद शिकवून मग उपदेश करतो. हे शिष्या, तूं खरें भाषण कर, धर्मप्रमाणें वाग, आपल्या अध्ययनापासून कधींही बेसावध राहूं नकोस. गुरूला दक्षिणा देऊन त्यांची आज्ञा घे, नंतर आपल्याला योग्य अशा स्त्रीबरोबर लग्न कर, आणि मग तिजपासून पुत्रोत्पत्ति कर. आपल्या वंशाचा विच्छेद करूं नकोस. सत्य सोडूं नकोस, धर्मापासून कधीं बेसावध राहूं नकोस. आपल्याला कल्याणदायक अशा गोष्टी करण्याला बेसावध राहूं नकोस, प्रामाणिकपणानें द्रव्य मिळविण्याविषयीं कधीं आळस करूं नकोस, अध्ययन करणें व शिष्यास पढविणें ह्या दोहोंविषयीं बेसावध राहूं नकोस ॥ १ ॥

**देवपितृकार्य्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्य्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्म्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकꣳ सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि ॥२॥**

**अद्वैतटीका**—**देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यं** देवपित्र्ये कर्मणी कर्त्तव्ये । त्वं **मातृदेवः** माता देवो यस्य सः **भव** स्याः । **पितृदेवः भव । आचार्यदेवः भव । अतिथिदेवः भव ।** देवतावदुपास्या एत इत्यर्थः । **यानि अनवद्यानि** अनिंदितानि शिष्टाचारलक्षणानि **कर्माणि तानि त्वया सेवितव्यानि** कर्तव्यानि । **इतराणि** सावद्यानि शिष्टकृतान्यपि कर्माणि त्वया **नो** सेवितव्यानि । **यानि अस्माकं** आचार्याणां **सुचरितानि** शोभनचरितानि आम्नायाद्यविरुद्धानि **तानि** एव **त्वया उपास्यानि** ॥ २ ॥

**अर्थ**—देव व पितरें ह्यासंबंधीं कर्त्तव्यकर्मे करण्याला बेसावध राहूं नकोस. तूं आईला देव मान. बापाला देव मान. गुरूला देव मान. अतिथीला देव मान. सारांश देवाप्रमाणें त्यांची उपासना कर. जीं निंद्य नसून शिष्टाचारास अनुसरून आहेत अशीं कर्मे कर. त्यांशिवाय

दुसरीं कर्मे करूं नकोस. जीं वेदाला विरुद्ध नसणारीं चांगलीं कर्मे गुरु करीत असेल तीं तूं कर ॥ २ ॥

**द्वैतटीका—देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यं** कुत्रापि प्रमादं मा कुरु। शिष्यानुशासनप्रकारमेवाह ॥ मातृदेवेति ॥ **मातृदेवः** माता देववत्पूज्या यस्येति तथा **भव । पितृदेवः** पितादेववत्पूज्यो यस्येति तथा **भव । आचार्यदेवः** आचार्यो देववत्पूज्यो यस्येति तथा **भव । अतिथिदेवः** अतिथिः देववत्पूज्योयस्येतितथा **भव । अनवद्यानि यानि कर्माणि तानि सेवितव्यानि। इतराणि** अवद्यानि **नो** सेवितव्यानि । **अस्माकं यानि सुचरितानि तानि त्वया उपास्यानि** ॥ २ ॥

**अर्थ**—भगवत्पूजा इत्यादिक करण्यामध्यें व पितरांच्या श्राद्धादिक करण्यामध्यें कधीं अंतर करूं नकोस. [ शिष्यांना उपदेशांचा प्रकार सांगतो. ] आईला देवाप्रमाणें पूज्य मान, बापाला देवाप्रमाणें पूज्य मान, गुरूला देवाप्रमाणें पूज्य मान. अतिथीला देवाप्रमाणें पूज्य मान. जीं कर्मे स्तुति करण्याजोगीं आहेत तीं करीत जा. दुसरीं करूं नकोस. आमचीं जीं आचरणें योग्य आहेत तीं करीत जा ॥ २ ॥

**नो इतराणि । एके चास्मच्छ्रेयांसो ब्राम्हणाः । तेषा त्वयासनेन प्रश्वसितव्यम् । श्रद्धया देयम् । अश्रद्धयाऽदेयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्म्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ॥ ३ ॥**

**अद्वैतटीका—नो इतराणि** विपरीतानि। **ये के च अस्मत्** आचार्यत्वादिधर्मैरस्मत्तः **श्रेयांसः** प्रशस्यतराः **ब्राम्हणाः** संति **तेषां आसनेन** आसनदानादिना **त्वया प्रश्वसितव्यं** श्रमापनयनं कार्यं । यत्किंचिद्देयं तत् **श्रद्धया देयं । अश्रद्धया अदेयं** न दातव्यं। **श्रिया** विभूत्या **देयं । ह्रिया** लज्जया **देयं । भिया** भयेन **देयं । संविदा** मित्रादिकार्येण **देयं । अथ** एवं वर्त्तमाने त्वयि **यदि** कदाचित् **ते** तव **कर्मविचिकित्सा**

कर्मणि श्रौते वा स्मार्ते विचिकित्सा संशयः **वा वृत्तविचिकित्सा** वृत्ते आचार्यलक्षणे कर्मणि विचिकित्सा संशयः **स्यात्** भवेत् ॥ ३ ॥

**अर्थ**—त्या विरुद्ध अशीं दुसरीं कर्मे करूं नकोस. जे गुरूपेक्षां श्रेष्ठ ब्राम्हण असतील त्यांना आसन इत्यादि देऊन त्यांचे श्रमांचा परिहार करावा. जें कांहीं देण्याचें असेल तें भक्तीनें द्यावें. तें अभक्तीनें देऊं नये. संपत्ति असून द्यावें. लाजेनें द्यावें. भयानें द्यावें. मित्राचें कार्य करण्याकरितां द्यावें. ह्याप्रमाणें तूं वागत असतां जर तुला श्रौतस्मार्त कर्माविषयीं संशय आला ॥ ३ ॥

**द्वैतटीका**—**इतराणि** असुचरितानि तानि त्वया **नो** उपास्यानि । **ये के च अस्मच्छ्रेयांसः** अस्मत्तोऽपि श्रेष्ठाः **ब्राम्हणाः** संति **तेषां** ब्राम्हणानां **त्वया आसनेन** आसनाद्युपचारेण **प्रश्वसितव्यं** प्रश्वासः श्रमापनोदः महात्मनामागमने तच्छ्रमापनोदो यथा तथा कर्तव्यं । **श्रद्धया देयं । अश्रद्धया** अपि **देयं** गुणश्रद्धाभावे प्रधानदानपरिलोपो न कार्य इतिभावः। **श्रिया** प्रसन्नेन मनसा **देयं । न्हिया** लज्जया **देयं । भिया देयं । संविदा देयं अथ** अंतरे मां विहार्य देशांतरगतस्य **ते यदि कर्मविचिकित्सा** यज्ञादिभगवदाराधनकर्मविषये संदेहः **वा** अथवा **वृत्तविचिकित्सा** कर्मांगआचारविषयकसंदेहः **स्यात्** भवेत् ॥ ३ ॥

**अर्थ**—या दोहोंहून वेगळीं अशीं जीं निंद्य कर्मे आहेत तीं करूं नकोस. जे कोणी ब्राम्हण आमच्याही पेक्षां ज्ञानानें श्रेष्ठ आहेत ते ब्राह्मण आपल्या घरीं आले असतां त्यांना आसन वगैरे देऊन जेणेंकरून त्यांचे श्रम दूर होतील तसें कर. श्रद्धेनें त्यांना देत जा. कदाचित् श्रद्धा नसली तरी सुद्धां द्रव्य देत जा, कारण श्रद्धा हें अंग आहे व दान हें प्रधान आहे, व अंग नसलें तरी प्रधानाचा त्याग करूं नये. मन प्रसन्न करून द्यावें. लज्जेनें द्यावें. भीतीनें द्यावें. ज्ञानपूर्वक द्यावें. हे शिष्या, मला सोडून तूं एकटा कोठें दूर देशीं गेलास, आणि तेथें जर तुला भगवंताचें यज्ञादिक आराधनामध्यें कोठें संशय आला, अथवा कर्मांगाचें आचरण करण्यामध्यें संशय आला॥ ३ ॥

**ये तत्र ब्राम्हणाः सम्मर्शिनः । युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्म्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्त्तेरन् । तथा तत्र वर्त्तेथाः । अथाभ्याख्यातेषु । ये तत्र ब्राम्हणाः सम्मर्शिनः । युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्म्मकामाः स्युः । यथा ते तेषु वर्त्तेरन् । तथा तेषु वर्त्तेथाः । एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमुचैतदुपास्यम् ॥ ४ ॥ स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् तानि त्वयोपास्यानि विचिकित्सा वा स्यात्तेषु वर्त्तेरन् सप्त च ॥ इत्येकादशोऽनुवाकः ॥११॥**

**अद्वैतटीका**—तर्हि **ये तत्र** तस्मिन् देशे काले वा **संमर्शिनः** विचारक्षमाः **युक्ताः** कर्मणि अभियुक्ताः **आयुक्ताः** अपरप्रयुक्ताः **अलूक्षाः** अरूक्षा अक्रूरमतयः **धर्मकामाः** अदृष्टार्थिनः अकामहताः **ब्राम्हणाः** स्युः **ते यथा तत्र** तस्मिन् कर्मणि वर्त्तेरन् **तथा** त्वमपि **तत्र वर्त्तेथाः** वर्त्तस्व । **अथ अभ्याख्यातेषु** केनचिदभ्युक्तदोषेण संदिह्यमानेन संयोजितेषु **ये तत्र संमर्शिनः युक्ताः आयुक्ताः अलूक्षाः धर्मकामाः ब्राम्हणाः** स्युः **ते यथा तत्र वर्त्तेरन् तथा तत्र वर्त्तेथाः । एषः आदेशः** विधिः । **एषः** पुत्रादीनां **उपदेशः** कर्त्तव्यः । **एषा वेदोपनिषत्** वेदरहस्यं । **एतत् अनुशासनं** ईश्वरवचनं । **एवं** यथोक्तं सर्वं **उपासितव्यं** कर्त्तव्यं । **च एवं एतत् उपास्यं**[1] **उ** उपास्यमेव ॥ ४ ॥ इत्येकादशोऽनुवाकः ॥ ११ ॥

**अर्थ**--तर त्या प्रसंगी (अथवा त्या ठिकाणीं) विचारी, कर्म करणारे, दुसऱ्यांनीं कर्म करावयास लावलेले, शांत बुद्धि असलेले, कामाधीन नसलेले असे ब्राम्हण त्या संशययुक्त कर्माविषयीं जसे वागत असतील तसा तूं वाग. जे सदोष असतील त्यांच्याशीं विचारी, कर्म करणारे, दुसऱ्यांनीं कर्म

१ पुनर्वचनमादरार्थं ।

करावयास लावलेले, व शांत बुद्धि असलेले, कामाधीन नसलेले असे ब्राम्हण जसे वागत असतील तसा तूं वाग. हा विधि आहे. हा पुत्रादिकांना उपदेश आहे. हें वेदरहस्य आहे. हें ईश्वराचें वचन आहे. ह्याप्रमाणें वागावें. ह्याप्रमाणें वागणूक करावी ॥ ४ ॥ ह्याप्रमाणें अकरावा अनुवाक संपला ॥ ११ ॥

**द्वैतटीका—तत्र** तदा **ये ब्राम्हणाः सम्मर्शिनः** विमर्शकारिणः **युक्ताः** योगयुक्ताः **आयुक्ताः** स्वधर्मानुष्ठानाग्रहयुक्ताः **अलूक्षाः** प्रश्नेकृते कोपरहिताः **धर्मकामाः** अदृष्टार्थिनः ते महात्मानः **तत्र** तव विचिकित्सिते कर्मणि वृत्ते वा **यथा** च **ते वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः । अथ** अर्थांतरे **अभ्याख्यातेषु** निंदितेषु विचिकित्सा स्यात् **तत्र ये ब्राम्हणाः सम्मर्शिनः युक्ताः आयुक्ताः अलूक्षाः धर्मकामाः स्युः यथा तेषु** ते **वर्तेरन् तथा तेषु वर्तेथाः । एषः आदेशः** इयमाज्ञाहरेः। न केवलमाज्ञा किंतु **एषः उपदेशः ।** अपि तु **एषा वेदोपनिषत्** वेदरहस्यं । **एतत् अनुशासनं** शिक्षा । **एवं उपासितव्यं** प्रागुक्तसत्यत्वादिकमवश्योपास्यमिति द्विरुक्त्यावधारयति ॥एवमिति॥ **एवं एतत् उ च** एव **उपास्यं** ॥ ४ ॥ इत्येकादशोऽनुवाकः ॥ ११ ॥

**अर्थ**—तर तेथें विचारानें वागणारे, योग करणारे, आपल्या कर्मांचें अनुष्ठान करण्यामध्यें तत्पर रहाणारे, प्रश्न केला असतां राग न आणणारे, धर्माची इच्छा करणारे, असे जे मोठमोठे विद्वान असतील ते जसें आचरण करतील तसें तूंही आचरण कर. तसेंच निंदित कर्माविषयींही, विचारानें वागणारे, योग करणारे, आपल्या कर्मांचे अनुष्ठानांत तत्पर रहाणारे, धर्माची इच्छा करणारे, प्रश्न केला तर राग न आणणारे, असे जे मोठमोठे विद्वान असतील, ते जसें आचरण करीत असतील तसें तूं आचरण करीत जा. ही ईश्वराची आज्ञा आहे. केवळ ईश्वराची आज्ञा आहे येवढेंच नव्हे, तर हा वेदांत सांगितलेला उपदेश आहे. हे वेदाचें रहस्य आहे. ही शिक्षा आहे. अशा रीतीनें उपासना करावी. [ पूर्वी

सांगितलेली सत्यत्वादिकांची उपासना करावी हें निश्चयानें सांगण्याकरितां दुसऱ्यानें सांगतों. ] ह्याप्रमाणें उपासना करावी ॥ ४ ॥ ह्याप्रमाणें अकरावा अनुवाक संपला ॥ ११ ॥

**शन्नो मित्रः शं वरुणः । शन्नो भवत्वर्यमा । शन्न इन्द्रो बृहस्पतिः । शन्नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रम्हणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रम्हासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रम्हावादिषम् । ऋतमवादिषम् । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् ॥ १ ॥ सत्यमवादिषं पञ्च च ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥ इति द्वादशोऽनुवाकः ॥ १२ ॥**

**टीका**—शांत्या विद्या उपक्रम्य समापिता तामेव विघ्ननिवृत्तौ शक्तेतिभावेन तां अंतेऽपि पठति ॥ शंन्नो मित्र इति ॥ **मित्रः नः** अस्माकं **शं** सुखप्रदो भवतु । **वरुणः** नः अस्माकं **शं** सुखप्रदो भवतु । **अर्यमा** सूर्यः **नः** अस्माकं **शं** सुखप्रदो भवतु । **इंद्रः नः** अस्माकं **शं** सुखप्रदो भवतु । **बृहस्पतिः** नः अस्माकं शं सुखप्रदो भवतु । **उरुक्रमः** विष्णुः **नः शं** सुखप्रदो भवतु । **ब्रम्हणे** चतुर्मुखाय **नमः** अस्तु । हे **वायो ते** तुभ्यं **नमः** अस्तु । **त्वं एव प्रत्यक्षं ब्रम्ह असि । त्वां एव प्रत्यक्षं ब्रम्ह अवादिषं** उपदिष्टं । **ऋतं** यथार्थविज्ञानवंतं **अवादिषं । सत्यं** यथार्थज्ञानपूर्वककर्त्तारं **अवादिषं । तत्** वायुरूपं ब्रम्ह **मां** श्रोतारं **आवीत्** रक्षितवान् । तत् **वक्तारं** विद्योपदेष्टारं **आवीत् । मां आवीत् । वक्तारं आवीत् । ॐ शांतिः शांतिः शांतिः ।** इति द्वादशोऽनुवाकः ॥१२॥

**अर्थ**—[ शांतिपाठ म्हणून ब्रम्हविद्येला आरंभ करून ती संपविली. तोच शांतिपाठ विघ्नांचा नाश होण्यासाठीं शेवटींही म्हणतों. ] मित्रदेव आम्हाला सुखकारक होवो. वरुण आम्हाला सुखकारक होवो. अर्यमा देव आम्हाला सुखकारक होवो. इंद्र आम्हाला सुखकारक होवो. बृहस्पति

आम्हाला सुखकारक होवो. विष्णु आम्हाला सुखकारक होवो. ब्रम्हदेवाला नमस्कार असो. हे वायु, तुला नमस्कार असो. तूंच प्रत्यक्ष ब्रम्ह आहेस. तूंच प्रत्यक्ष ब्रम्ह आहेस असें बोललों. तूं यथार्थज्ञानवान् आहेस असें मी बोललों. तूं खरें जाणून तसे वागणारा आहेस असे मीं बोललों. त्या ब्रम्हानें माझें रक्षण केलें. त्या ब्रम्हानें गुरूचें रक्षण केलें. माझें रक्षण केलें. गुरूचे रक्षण केलें. शांति असो, शांति असो, शांति असो ॥ १ ॥

ह्याप्रमाणें बारावा अनुवाक संपला ॥ १२ ॥

**शन्नः शीक्षाꣳ सह नौ यच्छन्दसां भूः स यः पृथिव्यो-मित्यृतञ्चाहं वेदमनूच्य शन्नो द्वादश ॥ १२ ॥ शन्नो मह इत्यादित्यो नो इतराणि त्रयोविꣳशतिः ॥ २३ ॥ हरिः ॐ ॥ शन्नो वक्तारम् ॥ इति शीक्षाध्यायः ॥ १ ॥**

---